ॐ.

वंगीय सत्पुरुष

# श्रीनागमहाशय

यांचें चरित्र.



लेखक

श्रीराम वासुदेव सोमण, उमरावती.

---

सप्टेंबर १९२३. ] प्रकाशक
श्रीकृष्ण बाळकृष्ण जोशी,
उंबर्डेकर, कारंजा—वऱ्हाड. [ किं १२ आणे.

बहुजनसमाजाच्या कल्याणाकरितां,

भगवान्, संतरूपानें अनंत अवतार घेऊन,

त्याच्या कल्याणाचा मार्ग त्याला स्वतः

आचरण करून दाखवितो;

## त्या त्याच्या अनंत विभूतींना

ही अल्प सेवा

अनन्यभावानें समर्पण केली आहे.



# अनुक्रमणिका.







# शुद्धीपत्र.



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ३ | १६ | उरकल्यावर | उकरल्यावर |
| ५ | १३ | कोसी | कोस |
| १८ | ११ | जावायचा | जावयाचा |
| १९ | २० | व्हिजिट घेऊन | व्हिजिट फी घेऊन |
| ६१ | २८ | पावमळ्या | पावसाळ्या |
| ६६ | १७ | निवस | दिवस |
| ८२ | २३ | भ्रातृभाव | मातृभाव |
| ८३ | १६ | तयाच | तसाच |
| ९४ | १२ | कैलास बसू कगैरे | कैलास बाबू वगैरे |
| ११८ | ८ | श्रीराकृष्ण | श्रीरामकृष्ण |
| ११८ | २० | नागमशयाकडे | नागमहाशयाकडे |
| १२० | २३ | त्याना बरोबर | त्याच्याबरोबर |
| १२३ | २५ | नागमशयाची | नागमहाशयाची |



त्रिखंडविजयी श्रीमत् परमहंस

## स्वामी विवेकानंद

यांचे सद्गुरु

# भगवान् श्रीरामकृष्ण.

याचें मूळ बंगाली ग्रंथाच्या आधारें लिहिलेलें विस्तृत चरित्र छापत आहे. चरित्राचे सुमारें चारचारशें पानांचे दोन भाग होतील. पहिला भाग येत्या दिवाळीच्या सुमारास प्रसिद्ध होईल. प्रत्येक भागांत ३।४ सुंदर चित्रें येतील. मराठी भाषेंत अशा प्रकारचें हें पहिलेच पुस्तक असून, त्यावरून श्रीरामकृष्णाची थोरवी केवढी होती, हें कळून येईल.

खालील पत्त्यावर नावें नोंदण्याची त्वरा करावी.

गंगाधर लक्ष्मण जोशी,

खापर्डे याचा बगीचा, मालटेकडी रोड,

उमरावती.

॥ श्रीरामसमर्थ ॥

# प्रस्तावना.



**जो जाणेल भगवंत । त्या नांव बोलिजे संत ।**
**जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥**

श्रीमद्दासबोध, ६११६.

**साधुचरित सुभसरिस कपासू ।**
**निरस बिसद गुनमय फल जासू ।**
**जोसहि दुःख परछिद्र पुरावा ।**
**बंदनीय जेहि जगजसु पावा ॥**

श्रीतुळसीदास रामायण बालकाड चौ ५–६

अर्थ —ज्याप्रमाणे कापूस शीत, उष्ण, वर्षा वगैरे दु खे सहन करून नतर चरक्यातून निघून, सूत कापड वगैरे अवस्थातरात्मक दु'खे भोगून, शिपी, धोबी वगैरेंच्या हातातून स्वत' जात असतानाच्या दु'खाच्या स्थिती-तून निघून, दुसऱ्याची शरीरे झाकून त्याच्या दु'खाचे निवारण करितो त्याचप्रमाणे सत्पुरुष स्वत अनेक कष्ट सोसून दुसऱ्यावर उपकार करितात.

सुप्रसिद्ध वगीय सत्पुरुष भगवान् श्री रामकृष्ण परमहस याच्या अत्यत श्रेष्ठ भक्तात ज्याची गणना केली जाते, त्या श्रीनागमहाशयाचे हे चरित्र माझे मित्र श्री श्रीराम बासुदेव सोमण यानी श्रीयुत शरच्चद्रचक्रवर्ती याच्या मूळ बगाली चरित्रावरून रूपातरित केले आहे. हिदुस्थानात चरित्रात्मक वाङ्मय थोडे असून, त्यातल्या त्यात सतचरित्रात्मक ग्रथ तर फारच थोडे आहेत. जुन्या कवींनीं प्रेमळपणाने गाईलेलीं स्वपरप्रातीय साधूची त्रोटक चरित्रे वगळली, तर प्रसिद्धीकरिता साधन सामुग्री उपलब्ध झाल्यानतर सुद्धा, चरित्रग्रथाची पैदास आपल्या महाराष्ट्रभाषेत फारशी झालीच

नाही असेच म्हणावे लागते. महाराष्ट्रातील इतर दृष्टीने नामांकित असलेल्या पुरुषांच्या चरित्राची महाराष्ट्रभाषेला जितकी जरूर आहे, तितकीच, किंबहुना त्यापेक्षाही जास्त, महाराष्ट्रीय व इतर प्रांतीय सत्पुरुषांच्या चरित्राची आहे, ही जाणीव महाराष्ट्रातील विद्वानांच्या लक्षात येऊन त्या दृष्टीने नुकतेच प्रयत्न सुरू झाले आहेत हें परमभाग्य होय. श्री. ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकरांची संतकविचरित्रमाला ईश्वरकृपेने पूर्ण झाल्यास, मराठी वाङ्मयाला ती एक भूषणभूत गोष्टच होऊन राहील. परप्रांतीय साधूंच्या चरित्राची महाराष्ट्राला ओळख करून देण्याचे अवघड कामही कै. वा. श्री. भास्कर विष्णू फडके यांनी मोठ्या प्रेमाने सुरू केले होते. श्रीरामतीर्थमालेनंतर त्यांच्या श्रीविवेकानंद चरित्राला प्रारंभ होऊन काहीं दिवसांनी त्यांना परलोकीं जावे लागले, ही मोठीच हानि झाली. तथापि निराश न होता त्यांच्या संकल्पित कार्याचा भार आपल्या शिरावर घेऊन, त्याला समाप्त करण्याचे त्यांचे सहसंपादक मंडळींनी मनावर घेतले आहे. त्यांचा हा प्रयत्न ईश्वरकृपेनें कै. वा. फडके यांच्या इच्छेप्रमाणे सिद्धीस जाईल यांत संशय नाहीं.

रा. सोमण यांचा प्रस्तुत प्रयत्न उपरिनिर्दिष्ट दिशेने संशोधनात्मक सुविस्तृत पद्धतींने केलेला नसून, ते मूळ बंगालीचे निव्वळ रूपांतर असले तरी, ते पुढे आणून त्यांनी महाराष्ट्रवाचकांवर उपकारच केले आहेत असे म्हणणे धाडसाचे होणार नाही.

संत निर्माण करण्याचा विशेष हक्क कोणत्याही एका विवक्षित देशाचा नाही. प्रत्येक ठिकाणी संत निर्माण झाले असून त्यांनी केलेले कालपरिवर्तन चिरस्मरणीयच आहे, परंतु भारतवर्षाकडे दृष्टी फेंकली असतां या देशातल्याइतके सत्पुरुष दुसऱ्या कोठेही निर्माण झाले नाहींत असेच दिसून येईल. या देशाचा इतिहास जितका प्राचीन आणि गौरवास्पद आहे, तितकाच त्याच्या संतांचा आणि संतकवींचाही आहे. भारतवर्षीयांची मनोरचना एका विवक्षित प्रकारची भावनाप्रधान असल्यामुळे, त्यांच्यावर वेळोवेळीं येणाऱ्या संकटांनीं त्यांचे वैशिष्ट्य नामशेष होण्याची भीति असल्यामुळेंच कीं काय, विधात्यानें आपल्या लाडक्या

भूमिवर वेळोवेळी संत पाठवून देण्याची विशेष योजना करून ठेविली असावी असे वाटते! भारतीय वीर श्रेष्ठांइतकीच कामगिरी भारतवर्षीय संतश्रेष्ठांनी बजाविली आहे, किंबहुना वीरवृत्तीचे लेणे ल्यायलेल्या स्थितप्रज्ञ व कर्मयोगी संतांची उदाहरणे ही भारतवर्षाच्या इतिहासात काही थोडी थोडकी नाहीत भारतमातेच्या कंठातील विज्ञानमणिमालेतील पदकाधिष्ठित मणि म्हणजे वेदांत ज्ञान होय. या वेदांतामुळेच भारतवर्षाला हल्लीची हलाखीची स्थिति प्राप्त झाली, असे म्हणणारा हिंदमातेच्या पोटीच जन्म घेतलेल्या पुत्रांपैकी काहींचा बनलेला बराच मोठा समाज असून त्याची शक्ती दिवसेंदिवस कमी होत चालली आहे ही भारतातल्या तत्वज्ञान प्रतिपादक संतांचीच कृपा होय. ब्रह्मीभूत श्रीविवेकानंदांच्या "Let the lion of Vedant roar!" या घनगर्जनेनेच वरील दुबळ्या विचाराच्या लोकांची खात्री पटावयाला लागली असावी तत्वज्ञानाच्या अभावी आजच्या जगाची स्थिति जंगली जनावराच्याही पलीकडे गेलेली आहे! हा भारतवर्षाच्या वैशिष्ट्यस्थापनेचा प्रभातकाळ आहे, ही गोष्ट प्रस्तुत काळची सर्व देशातील विचारी माणसांची विचारपरंपरा पाहिल्याने कळून येणारी आहे! अशा वेळी आजपर्यंत मागे पडलेल्या संतचरित्रांच्या कार्याला हिंदुस्थानाने इतर गोष्टींबरोबरच जोराने लागले पाहिजे. कारण दुर्दैवी हिंदुस्थानाची "इदंच नास्ति परं न लभ्यते" अशी केविलवाणी स्थिति झालेली आहे! योग्य आदर्श नेहमी—अगदी तिन्ही त्रिकाल—जवळ ठेवण्याइतकी चरित्रसामुग्री भारतवर्षात भरपूर आहे. राजकारणालाच धर्म समजण्याची आवश्यकता जरी काहींच्या मनाने नसली, तरी अधर्मी राजकारण ह्याही हिंदुस्थानाचा केव्हाच विशेष नव्हता, व यापुढेही तसा तो राहणार नाही.

सत्पुरुषाच्या अवतराची सारखी साखळी आजपर्यंत परमेश्वराने या भूप्रदेशावर घडवीत ठेविली आहे, व त्यामानाने इतर देशात त्याचा जवळ जवळ अभाव होत चालला आहे, हे या देशाच्या तत्वोज्ज्वल वैशिष्ट्याचे निदर्शकच आहे. साधूंची स्फूर्तीदायक चरित्रे सर्वांना संसार सोडून द्यावयास सांगत नसून, सद्भावनेने सुखाचा संसार करावयाला शिक-

वीत असतात. नागमहाशयाचे प्रस्तुत चरित्र वाचून वरील विधानाला कोणी कदाचित् हसतील, पण खोल विचार केल्यावर त्याची खात्री पटेल कीं, नागमहाशयाचे चरित्र आजच्या स्थितीला देखील आदर्शवत् आहे. संतांचीं चरित्रे बहुपैलू असतात. निवृत्तिमार्ग्याला ज्याप्रमाणे ती लोभनीय वाटतात, त्याचप्रमाणे निवृत्तियुक्त प्रवृत्तिमार्ग्याला म्हणजे उच्च दर्जाच्या प्रापंचिकाला त्याच्या मार्गावरील दिशा अचुक दाखविण्याचे सामर्थ्यही त्यांच्यात असते. याला केवळ एकच दैदिप्यमान उदाहरण दिले तरी बस्स होईल श्रीभगवान् रामकृष्ण परमहंसासारख्या केवळ निवृत्तिपर ब्रह्माधिष्ठित सद्गुरूचा शिष्य श्रीमद्विवेकानंद त्रिखंडकीर्ति झाला स्वामींच्या चरित्रातील एक एक प्रसंग लोकोत्तर असून त्यांच्या वचनातील प्रत्येक अक्षर स्फूर्तिदायक आहे, आणि या सर्वांच्या अंतर्भूत श्रीपरमहंसाचीं कृपा नाही असे कोण म्हणेल ? मनुष्यप्राणी उत्पन्न झाल्याबरोबरच प्रवृत्तिरूप मायेला तो आपल्याबरोबर घेऊन येतो उत्तरोत्तर याच मायेचा तो गुलाम बनतो. मायिक प्रवृत्ति सदसद्विचाराचें गाठोडें गुंडाळून दूर भिरकावून देते, व शेवटीं मनुष्यप्राणी काही काळ प्रवृत्तीच्या घटोत्कची बाजारात गटांगळ्या खात असला, व स्वतःला अत्यंत सुखी समजून दुसऱ्याला तुच्छ लेखताना दिसत असला तरी अधःपतनाच्या काळमुखात त्याला लवकरच समाधि घ्यावी लागते !

मानवी मनोवृत्तीची ही दुर्दशा टाळण्याकरिताच वेळोवेळी संताचे अवतार होत असतात, व प्रथमच त्यांचेकडून मायिक प्रवृत्तीच्या निषेधाचे तडाखे सुरू होतात लहानशा उंदराला बांधावयाचे झाले तर साध्या दोऱ्याने बांधून भागत नाही, त्याला कुरतडता येणार नाही, अशा वस्तूचा उपयोग करावा लागतो मग मायेसारख्या प्रबल राक्षसीला बांधण्याकरिता व एकंदर जनतेच्या कल्याणाकरिता संतांना कडकडीत वैराग्याच्या उपदेशाचा साखळदंड तयार करवावा लागला तर त्यात काय आश्चर्य आहे ? गुणमायेचा संसार जसजसा वाढत जातो तसतशी विवेकबुद्धीची एक एक पिढी कमी होत जाते. निवळ इहलौकिक कल्याणाची जरी अपेक्षा असली, तरी विवेकबुद्धी जागृत ठेविल्यावाचून गत्यंतर

नाही. “ जनामध्ये सार्थकता । विवेकंचि होय। ” विवेकबुद्धि जागृत राहण्याकरिता “ प्रपच उपाधी न साडिता ” देखील प्रयत्न करिता येतो ह्या प्रयत्नाचे मुख्य स्थान म्हणजे सतसमागम हेच होय.

प्रत्यक्ष सगतीच्या अभावी त्याच्या पुण्य चरित्राचे श्रवण मनन केल्यास चित्ताचे ठिकाणी शातता उत्पन्न होऊन प्रयत्न करण्यास, “पृथ्वी माजी जितकी शरीरे । तितुकी भगवताची घरे,” असे मानण्याइतका दिव्य साक्षात्कार होतो. उच आवाजाने सर्व दिशानी बधुभावाचे दाडगे निरूपण करूनही निराशा होऊन उलट विपरीतच स्वरूप दृश्यमान होते, याचा अनुभव आपल्या देशाच्या आजच्या परिस्थितीकडे पाहिले असता आलेला दिसून येईल दुर्दैवी भारतवर्ष काळाच्या ओघाबरोबर वहावले असले, तरी त्याला त्याची खरी ओळख पटवून त्याचे सर्व बाजूनी कल्याण होणे अशक्य नाहीं चालू प्रयत्नाबरोबरच त्याला आतूनही विशुद्ध करावयाला पाहिजे आहे

देशातील प्रत्येक व्यक्ति सात्विक तेजाने अलकृत झाली पाहिजे. सात्विकता कर्मसन्यास शिकवीत नसून उलट कर्तव्यस्फूर्तीला उजळा देण्याचे कार्य ती करीत असते सताना असाधारण महत्त्व असते ते त्याच्या सात्विकतेमुळेच असते. त्याच्या एका शब्दाबरोबर अनेक अननुभूत चमत्कार होतात राजाच्या दडात जे सामर्थ्य प्रसगी दृश्यमान होत नाहीं, त्यापेक्षा किती तरी पट ज्यास्त सामर्थ्य साधूच्या एका शब्दातून उदय पावते असे असल्यामुळे सत–मग ते कोणत्याही मार्गाचे असोत,– समाजाच्या गुरुस्थानी लेखिले जातात जगातलि कोणतेही महत् कार्य करणाऱ्याच्या अगी विशिष्ट भगवदश असलाच पाहिजे “ जे का रजले गाजले । त्यासि म्हणे जो आपुले । तोचि साधू ओळखावा । देव तेथेची जाणावा ॥ ” दुःखिताचीं दुःखे निवारण करण्याकरिता विशिष्ट प्रसगीं साधूच्या वाणींतून निघालेल्या तेजाने भाग्लेल्याच तरवारी चमकलेल्या आहेत. असल्या स्फूर्तिदायक चरित्राचे श्रवण भक्तिपूर्वक झाले तर मानवी वैशिष्ट्य मूळपदाला गेल्यावाचून राहणार नाहीं, व त्यामुळे

जगावरच्या अनेक आपत्ति टळतील. तात्पर्य, साधूचरित्र आचार विचारांना योग्य दिशा दाखवून इहपरत्र कल्याणाचा मार्ग दाखवावयाला कारणीभूत होत असते. आजच्या जगाला तर " नुसते तत्वज्ञानच शिकाविले पाहिजे." असे म्हटले, तरी वरवर पाहणारावाचून इतराना त्यात विपरीत असे काहीच वाटणार नाहीं. असो.

नागमहाशयाचे प्रस्तुत चरित्र काळजीपूर्वक वाचून पहाणाराना त्याच्या चरित्राचे श्रीमत्परमहसाच्या चरित्राशीं स्थूल मानाने बरेच साद्दष्य आहे असे दिसून येईल विशेषेकरून वृत्तिसाम्य तर फारच बेमालूम आहे. परमहसाचा व नागमहाशयाचा वास्तविक खरोखर गुरुशिष्य सबध नव्हता नागमहाशयानी त्याचे कुलगुरु वगचद्र भट्टाचार्य याचा उपदेश घेतला होता. पण योगाने परमहसाच्या दर्शनाचा लाभ झाल्याबरोबर नागमहाशयाच्या चित्तात परमहसाची मूर्ति जी एकदा ठाण देऊन बसली ती तिथेच दृढ झाली, व लवकरच नागमहाशय परमहसाच्या भक्तमडळीत श्रेष्ठस्थान पटकावून बसले. नागमहाशयाची विवक्षित अशी उपासना नसली तरी 'श्रीरामकृष्ण' या त्याच्या देवतेकरिता ते साधकोचित धारणा करीत असत. परमहसाप्रमाणे त्याच्या चरित्रात प्रेमभक्तीची लयलूट आहे सर्वत्र ईश्वरप्राप्तीचा गोड अनुभव आहे. ससारनैवृत्य आहे, निर्भयता आहे व अपरपार उपास्यनिष्ठा आहे श्रीपरमहसानीं आपले गुरु तोतापुरी स्वामी याना सगुण उपासना सागून ते " गुरूचेही गुरु झाले, " त्याचप्रमाणे नागमहाशयानी आपल्या वडीलाना प्रवृत्ति मायेतून काढण्याची आजन्म काळजी वाहून, शक्य तोवर त्याचा उद्धार होण्याची खटपट अखेरपर्यत केली, व ते आपल्या वाडिलाचे वडील झाले, म्हणजे हेही गुरूचे गुरु झाले. ह्या महात्म्याच्या चरित्रात प्रेमाश्रू वहाण्यासारखे बरेच प्रसग असून, त्याचा अनुभव वाचकाना योग्य वेळीं आल्यावाचून रहावयाचा नाहीं. साधकाने तर या चरित्राचीं पारायणे करावीं व पावन व्हावें. नागमहाशयाच्या सबधाने श्रीविवेकानद स्वामीनीं काढलेल्या पुढील उद्गारात नागमहाशयाच्या चरित्राचें रहस्य उत्तम रीतीने विशद झाले आहे.

*" नागमहाशय हेच परमहंसाचे खरे भक्त होत. कारण, परमहंसाचे यथार्थ स्वरूप त्यानीं ओळखले आहे." "ज्यानीं भक्तिपुरःसर नाग महाशयाची सेवा केली आहे, त्याना आत्मज्ञानाकरिता अन्य तपःसाधनाची आवश्यकता नाहीं. **मी त्रिखंड फिरलों परंतु, नागमहाशयांच्या योग्यतेचा सत्पुरुष मला आढळलेला नाहीं.** या सत्पुरुषाला मी आज पंचवीस वर्षें पाहतो. परंतु याच्या वृत्तींत अणुमात्रही फरक झालेला नाही. कितीही शारीरिक क्लेश होवोत, किंवा विपत्तींचे डोंगर कोसळोत, ते कधींही डगमगत नसत. देवाचे नामस्मरण आणि अखंड स्वरूपानुसंधान याशिवाय दुसरे तिसरे त्याना काहीं माहीत नसे. या जगात निःसंग वृत्तीने कसे रहावे हे त्याच्या ठिकाणीं प्रत्यक्ष पहावयास सापडे अहाहा! आत्मज्ञानाविषयीं किती विलक्षण तळमळ! तसेच ईश्वराच्या ठिकाणीं किती विलक्षण निष्ठा!" धन्य श्रीनागमहाशय, व धन्य श्री स्वामी विवेकानंद!

आता फक्त एक दोन गोष्टींचा उल्लेख करून, बरीच लांबलेली ही प्रस्तावना आटपती घेतो. प्रस्तुत चरित्राची भाषा मराठी असली, तरी ते बंगालीचे रूपांतर असल्यामुळे त्या वळणावर गेल्यासारखी दिसते, पण रूपांतर गोड झाले आहे अशी वाचकाची खात्री होईल चरित्रात जागोजागीं "लेखक" असा शब्द आलेला आहे त्या स्थळी लेखक म्हणजे मूळ बंगाली चरित्रलेखक श्रीयुत चक्रवर्ती हे होत, हे वाचकाना सांगण्याची आवश्यकता नाही." रा. सोमण यांचा बंगाली वाङ्मयाचा व्यासंग उत्तरोत्तर दृढ होत जाऊन यापेक्षाही त्या भाषेंतील निराळ्या धर्तीच्या व विवेचन प्रचुर चरित्रात्मक व बोधपर ग्रंथाचा परिचय त्याच्याकडून महाराष्ट्रीय वाचकाना होवो, अशी परमेश्वराजवळ माझी सविनय प्रार्थना आहे, ॐ तत् सत्.

| मुक्काम बऱ्हाणपूर.<br>श्रीरामदासनवमी,<br>शके १८४९. | संताचा दासानुदास,<br>**बाळकृष्ण नारायण पांडे.** |
|---|---|

---

* कै. वा. भा. वि. फडकेकृत स्वामी विवेकानंदाचें चरित्र. भाग ४ था पृष्ठ ६४०.

# दोन शब्द.



भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस यांचे शिष्य श्रीनागमहाशय यांचे बंगाली चरित्र माझ्या वाचण्यात आले, व त्यांतील पुष्कळ गोष्टींनी माझ्या मनाला विलक्षण चटका लावून सोडला. असल्या अलौकिक महात्म्यांचे चरित्र, केवळ भाषाभेदास्तव, आम्हा महाराष्ट्रीयांस अपरिचित आहे, व याशिवाय आणखी किती महात्मे आम्हाला याच कारणामुळे अपरिचित असतील, व आम्ही त्यांच्या सच्चरित्राला व कल्याणकारक उपदेशाला पारखे होत असू, हे एक त्या जगन्नायकालाच ठाऊक, असा विचार मनांत आल्यामुळे मी या कार्यास हात घातला. श्रीनाग महाशयांचे चरित्र तारीखवार व सुसंगत उपलब्ध नसल्यामुळे, त्याची मांडणी नीट होणे अर्थातच शक्य नव्हते. भाषांतर मुळांत काहीही बदल न करिता, जसेंच्या तसेंच करण्याचा शक्य तो प्रयत्न केला आहे. म्हणून वाचक बंधू त्याच्या मांडणीकडे लक्ष न देता, हंसक्षीर न्यायानें त्यांतील सदुपदेशाकडेच लक्ष देतील, अशी आशा आहे.

श्रीयुत शरत्चंद्र चक्रवर्ती यांनी उदार मनानें श्रीनाग-महाशयांच्या चरित्राचें भाषांतर करण्याची परवानगी दिली, याबद्दल त्यांचा मी फार ऋणी आहे, तसेंच, बऱ्हाणपूर येथील लोकप्रिय सॅनिटरी इन्स्पेक्टर रा. रा. भाऊसाहेब पांडे यांनी आपला अमूल्य वेळ खर्च करून या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली, याबद्दल मी त्यांचाही अत्यंत आभारी आहे. त्याचप्रमाणे ' जगद्धितेच्छु " प्रेसचे मालक रा. रा. केशव रावजी गोंधळेकर यांनीं पुस्तक थोड्या मुदतीत व सुबक रीतीनें छापून दिलें याबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहे.

शेवटीं ज्याच्या इच्छामात्रेंकरून जगाची घडामोड चालू आहे, त्या जगन्नायकाची, संतशिरोमणी श्रीतुकारामहाराज यांच्या शब्दांत " वेडें वाकुडें गाईन, परि तुझा म्हणवीन ! " अशी अनन्यभावें प्रार्थना करून दोन शब्द पुरे करितों.

**भाषांतरकर्ता**

श्री.

# प्रसिद्ध बंगाली साधू नागमहाशय यांचें चरित्र.

## प्रकरण पहिलें.



### जन्म व बाल्य वृत्तान्त.

ज्या महापुरुषाचा जीवनवृत्तान्त आम्हीं लिहिण्यास उद्युक्त झालों आहो, त्याच्यासंबधाने पूज्यपाद स्वामी विवेकानंद यांचे पुढीलप्रमाणें उद्गार आहेत स्वामी म्हणतात “ पृथ्वीचा पुष्कळ भाग मी फिरलो पण नागमहाशय याच्यासारखा महापुरुष मला कोठेंच आढळला नाहीं. ”

पूर्व बंगाल्यात नारायणगंज बंदराच्या सुमारे एक मैल पश्चिम दिशेस असलेल्या देवभोग नामें एका लहान खेड्यात, तारिख २१ आगस्ट सन १८४६ इसवी रोजीं, नागमहाशय यांचा जन्म झाला नागमहाशय यांचें पूर्ण नाव दुर्गाचरण नाग असे होते, परंतु ते सर्वांना नागमहाशय या नावाने परिचित असल्यामुळे, या ग्रंथात त्यांचा याच नावाने उल्लेख करण्याचे ठरविले आहे. नागमहाशय यांच्या वडिलांचे नाव दीनदयाळ असून, आईचे नाव त्रिपुरासुंदरी असे होते. दीनदयाळाच्या पित्याचें नाव प्राणकृष्ण व आईचे रुक्मिणी असे होते. यांचे मूळचे ठिकाण तिलारादि हे होते. देवभोग ग्रामात तीन पिढ्यापासून त्यांची वस्ती होती. दीनदयाळ खेरीज प्राणकृष्ण यास दोन कन्या झाल्या. त्यातील ज्येष्ठ जी भगवती, ती नवव्या वर्षींच विधवा झाल्यामुळे. पितृगृहींच रहात असे. कनिष्ट कन्या भारती, इच्या बाबतीत विशेष माहिती उपलब्ध नाहीं. ती

पितृगृही फारशी कधी आली नाही. तिचा मृत्यु भगवतीच्या आधी झाला एवढे ऐकिवात आहे.

नागमहाशयाच्या जन्मानतर ४ वर्षांनी त्याना एक शारदामणी नावाची बहीण झाली. तिच्यानतर दोन वर्षांनी दीनदयाळ यास एक कन्या झाली, ती चार महिन्यातच निवर्तली. तिच्यानतर दीनदयाळ यास पुत्र झाला व त्याच्या जन्मानतर दीनदयाळची पत्नी बाळत रोगाने मृत झाली, व जन्मलेले बाळकही एक महिन्यानतर मृत्युमुखी पडले. त्रिपुरासुदरीने मरण समयी आपली नणद भगवती इच्या ओटीत आपली दोन अपत्ये घातलीं व सुखाने देह ठेविला. मातेच्या मरणसमयी नागमहाशयाचे वय आठ वर्षांचे होते. व शारदामणीचे वय अवघे ४ वर्षांचे होते. दीनदयाळने पुन्हा विवाह केला नाही. बाल विधवा भगवती इने आपल्या भावाच्या मुलाचे व मुलीचे सगोपन मोठ्या प्रेमाने केले. विशेषतः तिचे नागमहाशय याचेवर जास्त प्रेम होते, ते इतके की तिच्या प्रेमाचें नागमहाशयास जेव्हा स्मरण होई तेव्हा ते म्हणत, कीं "पिशीमाई ( भगवतीला नागमहाशय याच नावाने हाक मारीत असत ) माझी जन्मोजन्मीची आई होती."

दीनदयाळ हा देव—द्विज—भक्तीपरायण व निष्ठावान् होता. त्याने कलकत्यात कुमार टोल्यात असलेल्या श्रीयुत राजकुमार व श्रीयुत हरिचरण पाल चौधरी याचेकडे नौकरी पत्करली, व कुमार टोल्यात एक लहानसे घरही बाधिले. पालबाबू व दीनदयाळ याचा जरी मालक व नौकर असा सबध होता तरी ते त्याना आपल्या कुटुबापैकींच एकजण समजत. धर्मभीरू, सत्यनिष्ठ व निर्लोभी दीनदयाळवर पालबाबूचा परम विश्वास होता. त्यानीं त्याच्याशी कधींच प्रतारणा केली नाहीं. एक वेळ हिशेबात काही हजार रुपयाची चूक झाली, तेव्हा दीनदयाळाने काही चोरी केली नाहीं ही पालबाबूची खात्री असल्यामुळे, त्यानीं सर्व रुपये खर्चीं घालून हिशेब मिळवून घेतला. सुमारे एक वर्षानतर सदरहू चूक नजरेस आली व हिशेब व्यवस्थेशीर मिळाले; ही गोष्ट पालबाबूस कळल्यावर, त्याचा दीनदयाळवरील विश्वास अधिकच दृढ झाला, व दीनदयाळ यास

स्वतंत्र रीतीने चार पैसे मिळविता येतील अशी पालबाबूनी तजवीज केली. दीनदयाळची निर्लोभता, खालील गोष्टीने अधिक स्पष्ट होईल "पालबाबूचा मिठाचा व्यापार होता, व ते कधी कधी मीठ जलमार्गाने नारायणगंज येथे पाठवीत असत त्यावेळेस जहाजाची नीटशी व्यवस्था नव्हती, व जलमार्गाने जाताना सुंदर-बनाजवळ लुटारूंची फार भीति असे. त्यामुळे प्रत्येक होडीवर एक साहसी व विश्वासू नोकर असण्याची फार गरज असे. एका फेरीला दीनदयाळ एका होडीवर होता, व मुक्कामाला पोंचण्यापूर्वी त्याना मध्येच संध्याकाळ झाली पुढे जाणे योग्य नव्हे असे वाटल्यावरून जवळच दोन तीन मोडकी घरे असलेल्या एका ठिकाणी त्यानी नौका थांबविण्याचे ठरविले रात्री कोळी लोक झोंपू लागले व दीनदयाळ हातात लाठी घेऊन तंबाग्र् खात जागत बसला पहाटे सुमारे ५ वाजता नौकेतून उतरून दीनदयाळ त्या मोडक्या घराच्या आड शौचास बसला. त्याचा स्वभाव थोडा चंचल असल्याने त्याने सहज बोटाने माती उकरण्यास सुरवात केली. थोडेसे उकरल्यावर त्याच्या हाताला काही नाणे लागल्याचा भास झाला म्हणून उत्सुकतेने आणखी जास्त उरकल्यावर त्याला मोहोरानी भरलेली एक घागर दिसली. त्यापैकी त्याने २-४ मोहोरा काढून पाहिल्या तो त्या मोहोरा फार प्राचीन काळच्या असल्याचे त्याला आढळून आले. त्याने ताबडतोब त्या मोहोरा घागरींत टाकून वर माती लोटली व नावाड्याजवळ येऊन "हे ठिकाण फार भयप्रद दिसते, लवकर नाव हाकला" असे सांगितले. "शौच मुखमार्जन करून मग निघू" असे नावाडी म्हणाले, पण त्याकडे त्याने मुळीच लक्ष दिले नाही त्या ठिकाणाहून २-३ मैल लांब गेल्यावर मग त्याने नौका थांबविण्यास सांगितले. या प्रसंगासंबधाने दीनदयाळ म्हणत की "त्या गुप्त धनाचा मला फार लोभ सुटला होता, पण मनात आले कीं हे धन जर कोणा ब्राह्मणाचे असेल तर ब्रह्मस्व हरण केल्याच्या पापाने अनंत काल नरकात पडावे लागेल, व या ठिकाणीं आणखी थोडा वेळ राहिल्यास पुन्हा लोभ उत्पन्न होईल म्हणून त्या स्थानाचा मी इतक्या त्वरेने त्याग केला."

नागमहाशयाचा बाल्यवृत्तात विशेष उपलब्ध नाहीं. बाल्यपणापासून त्याचा स्वभाव मिष्ट, सुशील व विनयसपन्न होता. त्याचे शरीर बाळसेदार व अगकाति सुदर होती. त्याच्या डोक्यावरील लाब लाब केस त्याना विशेष शाभा देत. दरिद्री कुळात जन्मल्यामुळे रुप्याच्या वाळ्याखेरीज त्याच्या अगावर कोणतेच अलकार नसत. तथापि खेळताना बागडताना त्याचे लाब केस व सुदर स्वभाव कोणालाही मोह पाडीत असे. शेजारील स्त्रिया नेहमी त्याना पाहिल्याबरोबर कडेवर उचलून घेत व त्याचे कौतुक करीत, पण खावयाची वस्तु त्याना देऊ लागल्यास मात्र ते ती कधीही ग्रहण करीत नसत. हे शात स्वभावी बालक कधी कधी एकटे बसून आकाशातील तारकाकडे टक लावून पहात असे. त्याने कधी कधीं आपल्या आतेस म्हणावे " आई, चल आपण त्या मुलखात ( आकाशाकडे बोट करून ) जाऊ, येथे मला मुळीच बरे वाटत नाही. " चद्रोदय झाल्यावर बालक नाचू बागडू लागे. वृक्ष डुलताना पाहून त्याच्या मनात वाटे की, ही झाडे आपणास खेळावयास बोलावीत आहेत. तेव्हा त्याने आपल्या आतेस म्हणावे " मी त्याच्याबरोबर खेळावयास जातो " असे म्हणून झाडाप्रमाणे अगविक्षेप करून नाचू लागावे ! ते मनोहर नृत्य पाहून त्याची आत्या आपले देहभान विसरून त्याचे वारवार चुबन घेई.

भगवती पुराणातील गोष्टी सागण्यात मोठी निपुण होती व गोष्टींच्या रूपाने ती महाभारत व भागवत यातील उपाख्याने नागमहाशयास झोप येईपर्यंत सागे सासारिक कृत्यानी त्रस्त झाल्यामुळे ज्या दिवशी भगवतीस कथा सागणे अशक्य होई, त्या दिवशी बालक तिची अगर्दी पाठ पुरवून लहान सहान तरी गोष्टी सागण्यास तिला भाग पाडीत असे. स्वप्नात देव देवीचे दर्शन होऊन भीतीने बालक कधी जागे होई व जवळ निजलेल्या आतेस जागे करी, पण सासारिक कष्टानी गाढ निद्रीत असलेली आत्या जागी न झाल्यास बालक भीतिग्रस्त स्थितीत तिच्याजवळ बसून राहत असे. सकाळी बालक आपले स्वप्न आतेस सागे, ते ऐकल्यावर ती विस्मयाने स्तभित होऊन जाई.

लहानपणी नागमहाशय याना खेळण्याचा विशेष नाद नव्हता, तरी

मित्राच्या आग्रहास्तव ते खेळत. पण खेळातही खोटी गोष्ट त्याना आवडत नसे. खेळात कोणी खोटे बोलल्यास ते त्या सवगड्याशीं भाषण बंद करीत, व जोपर्यंत तो खोटे न बोलण्याची प्रतिज्ञा करीत नसे, तोपावेतो त्याची मैत्री वर्ज करित. बाल्यकाळीही नागमहाशय कोणाशी भांडले नाहींत. त्याच्या सवगड्यात कोणाचे भांडण झाल्यास ते मध्यस्थी करून इतक्या सुंदर रीतीने भांडण मिटवीत की, दोन्ही पक्ष सारखेच संतुष्ट होत व सर्व-जण त्याना आपला पुढारी समजत खेळताना अगर थट्टेतही खोटे बोलणे त्याना आवडत नसे. अगदी लहानपणापासून ग्रामस्थ लोकाचे त्यावर सारखेच प्रेम होते, हल्ली हयात असलेले लोक म्हणतात कीं, " दीनदयाळच्या पुत्रासारखा सुशील, सच्चरित्र व नम्र मुलगा अजून आमच्या पाहाण्यात आलेला नाही. "

नागमहाशयाच्या वाढत्या वयाप्रमाणे त्याची ज्ञानपिपासाही वाढू लागली हल्लीप्रमाणे पूर्वी शिक्षणाच्या सोई नव्हत्या नारायणगंजात फक्त एक बंगाली शाळा होती, व तेथेच नागमहाशय शिकू लागले परंतु तेथे फक्त तीन इयत्ता होत्या त्यामुळे त्या झाल्यानंतर त्याचे शिक्षण बंद झाले. त्यामुळे त्याना फार वाईट वाटले. दीनदयाळ स्वगृही आल्यावर नागमहाशयानी शिकण्याकरिता कलकत्त्यास येण्याची इच्छा प्रदर्शित केली " साधारण उत्पन्नात कलकत्त्यातील शिक्षणाचा खर्च मला झेपणार नाही, असा वडीलाचा जबाब ऐकून नागमहाशयास मरणप्रायं दुःख झाले कल-कत्त्यास शिकण्याच्या आशेस तिलांजली देऊन, नागमहाशय, आस-पास कोठे शिकण्याची सोय होईल की काय, या शोधाला लागले. नारायण-गंजपासून ५ कोसावर डाका या गावीं पुष्कळ विद्यालये आहेत, असे त्यास समजले, पण तेथे शिकण्यास जावे तर रोज १० कोसी पायी चालावे लागेल व भगवती या विचाराला संमति देणार नाहीं, हे त्याच्या मनात आले. तरीही त्यानी जाण्याचा बेत ठरविला. भगवतीने व त्याच्या मित्रानीं त्याना परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण कोणाचे न ऐकता व कोणाला न विचारता, दुसऱ्या दिवशीं सकाळीं थोडे पोहे बरोबर घेऊन ते डाका येथे गेले. तेथे गेल्यावर एका बंगाली

शाळेत शिकण्याचे ठरवून परत घरी फिरले तो सध्याकाळ टळून गेली होती ते घरी येईपर्यंत भगवतीने त्याचा सर्व गावभर शोध केला पण व्यर्थ. ते आलेले पाहिल्यावर तिला कल्पनातीत आनद झाला. त्याना जेवावयास बसवून तिने " सर्व दिवस कुटे होतास ? " म्हणून चवकशी केली. व त्यानीही सर्व हकीगत तिला सागितली. "रोज सकाळी ४ वाजता काही खावयाचे करून देत जा, माझा शिकण्याचा निश्चय कायम आहे " असे त्यानी तिला स्पष्ट सागितले. त्याचा विशेष आग्रह पाहून भगवतीने त्याच्या विचाराला समति दिली, व "ईश्वर तुझे सदा मगल करो व मार्गाने तुला काही विघ्न न येवो " असा त्याना सप्रेम आशीर्वाद दिला

दुसरे दिवशी नागमहाशय ६ वाजता भोजन आटोपून डाका येथे गेले, व त्यानी आपले नाव नार्मल स्कूलमध्ये दाखल केले. या शाळेत त्यानी १५ महिने अध्ययन केले. उन्हाळा, पावसाळा वगैरे सर्व ऋतूत १५ महिन्यात फक्त त्याची २ दिवस गैरहजिरी होती ! परतु याचा परिणाम असा झाला की, त्याचे शरीर क्षीण होत चालले. ते पुढे म्हणत की " ज्या वेळेस मी डाका येथे शाळेत जात असे तेव्हा मला मुळीच कष्ट वाटले नाहीत. रानावनातून मी सहज येत जात असे, कधी भुकेचा त्रास वाटल्यास एक पैशाचे पोहे घेऊन खात खात घरीं येत असे" एके दिवशीं घरी येत असताना त्याना एक भूत दिसले, यासबधाने ते म्हणतात—" भूत, प्रेत वगैरे सर्व क्षुद्र देवता सत्य आहेत, खोट्या नाहीत, कारण रामकृष्ण भगवान् म्हणत " सर्व काहीं खरे आहे ". डाक्याहून घरी येताना आणखी एक दिवस हमरस्त्यावर मी एक भूत पाहिले. जवळच असलेल्या एका पिंपळाच्या झाडाला टेकून पश्चिमेकडे तोंड करून ते भूत उभे होते. मी आपल्याच विचारात मग्न असल्यामुळे त्याच्या अगदी जवळ येऊन पोहोचेपर्यंत मला येथे भूत आहे असे कळलेच नाही. जवळ येताच माझी नजर त्याच्याकडे गेली व मी एकदम खालीं बसलो. बराच वेळ त्याकडे पहात बसलो पण भूत हालेना. तेव्हा मनात आले कीं " हे काय ? मी तर कोणाचे काहीं अनिष्ट केले नाहीं, तर मग माझे तरी कोण काय करणार? भ्यावयाचे काय कारण ? " असा विचार करून मी उभा राहिलो व चालू

लागलो. त्या झाडाजवळून गेलो पण त्या भुताने काहीच हालचाल केली नाही. झाडापासून लाब गेल्यावर, कोणी तरी मोठ्याने हासल्याचा आवाज माझ्या कानावर पडला. पण मी मागे फिरून पाहिले नाही " नेहमीं पुढेही ते दिसत असे, त्यामुळे तो एक मनुष्यच आहे, असेच मला वाटूं लागले, व माझी भीति नाहींशी झाली "

नागमहाशयावर डाका येथील शाळेतील एका शिक्षकाचे पुत्रवत् प्रेम होते. त्याना इतक्या लाबून पायी यावे लागते हे पाहून ते म्हणाले " तू इतके कष्ट करून शिकण्यास येऊ नको. नाही तर आमच्या येथेच रहा, माझा खर्च कसाही चालेल" नागमहाशय म्हणाले " मला यात कोणतेच कष्ट वाटत नाहीत" शिकण्याची त्याची उत्कट इच्छा पाहून शिक्षक मनात म्हणाले ' हे बालक पुढे कोणी तरी थोर पुरुष होणार, हे खास. शिक्षक हयात असते तर त्याना आढळून आले असते कीं आपली वाणी अक्षरशः खरी झाली.

डाका येथील शाळेत नागमहाशय फारच थोडा काल होते, पण त्या कालातच त्यानी बगाली भाषेवर प्रभुत्व विळविले. त्याचे हस्ताक्षर ज्याप्रमाणे सुदर होते, त्याप्रमाणेच त्याची वाक्यरचना सरळ, अर्थगर्भित, व हृदयस्पर्शी होती. त्या काळी त्याच्यासारखी रचना क्वचितच आढळे. त्याचे त्या काळचे निबध धर्म व शील या विषयावर होते. ज्या वेळेस नागमहाशय कलकत्त्यास वैद्यकीचा अभ्यास करावयास आले त्या वेळी त्याचे निबध "मुलास उपदेश" या नावाखाली पुस्तक रूपाने छापले गेले. तें पुस्तक केंव्हा लिहिले व छापले या बाबतींत ते कधीही कोणाजवळ काहीं बोलले नाहीत. त्याचे परम मित्र सुरेशचद्र दत्त यानाही नागमहाशयाकडून त्या पुस्तकाची एक प्रत भेट येईपर्यंत काहीं कळले नाही. काहीं पुस्तके त्यानी देवभोग येथे मुलाना वाटण्याकरिता पाठवून दिलीं. त्यापैकी अजूनही तेथे एक दोन पुस्तके पहाण्यात येतात.

नागमहाशय याचे परम मित्र श्रीयुत हरप्रसाद मुजुमदार, याच्या पत्नीजवळ नागमहाशय यानी आपल्या बालपणातल्या ज्या काहीं गोष्टी सागितल्या होत्या, त्या त्यानीं पत्रद्वारे प्रस्तुत लेखकाकडे पाठविल्या आहेत,

त्यातील काही भाग खाली दिला आहे:—" नागमहाशय याचे बाल्य-जीवन किंवा काहीं विशेष गोष्टी मला माहीत नाहींत किंवा मी लिहि-ल्याही नाहींत. त्याच्या प्रत्यक्ष, दर्शनानतर त्यानी उपदेशद्वारे ज्या काहीं गोष्टी सागितल्या त्या मी टिपून ठेविल्या होत्या. त्याच्या स्मरणार्थ लिहिलेल्या एक दोन गोष्टींवरून त्याच्या चरित्राच्या माहितींत विशेषशी भर पडण्याची जरी आशा नाहीं, तरी त्यानी स्वतःच्या मुखाने सागितलेल्या गोष्टीतील १–२ गोष्टी आपणास बधुभावाने कळवीत आहे. मला वाटते त्या तुम्हा-लाही माहीत असतील. आपण नागमहाशय याचे परम शिष्य, आपली आज्ञा मला मोडणे शक्य नव्हते. धर्मसबधीं जे काहीं सहाय्य मला करणे शक्य आहे, ते मी करीन त्यात कोणत्याही प्रकारचे अडथळे आले तरी ते मी जुमानणार नाही. व त्यातच धन्यता मानीन." सत्य कथेसबधी एकदा स्वतः नागमहाशयानी खालील गोष्ट सागितली "लहानपणीं काहीं समवयस्क मित्र दुसऱ्या पक्षाला जीत करण्याकरिता काहीं खोटे बोलण्यास त्याना साग़ू लागले. " तुम्ही जर खोटे न बोलाल तर आपला पक्ष हरतो, म्हणून तुम्ही खोटे बोला " अशी त्या पक्षाने त्याची पुष्कळ विनवणी केली, पण व्यर्थ त्यामुळे सर्व मुले त्याच्यावर रागावलीं व त्यानीं त्याना जमीनीवर बरेच लाब फरफटत नेले, व पुन्हा बजावले की " जर पुन्हा तुमच्या खऱ्या बोलण्याने आमचा पराजय झाला तर आणखी चागली शिक्षा करू." त्याना फरफटत ओढल्यामुळे पुष्कळ लागले होते. घरी आल्यावर त्याच्या वडिलानीं व आतेने त्याना " काय झाले " म्हणून नाना तऱ्हेने विचारले, पण सर्व मोहल्यात विनाकारण तटे बखेडे होतील, म्हणून त्यानी त्या भाडणापैकी एकही अक्षर तोडावाटे काढले नाही" त्याची ही गोष्ट आठवली की अजूनही डोळ्याला पाणी येते.

२ डाका येथे शाळेत जात असताना रोज सकाळी भगवती त्याना बटाटेभात खाऊ घालीत असे, नतर ते पायी डाका येथे जात व पायी सध्याकाळी घरी येत. एक दिवस डाक्याहून परत येत असता फतुल्ला गावाजवळच एकदम वारा सुरू झाला, पाऊस सुरू झाला व जणू काय प्रलय होतो असे वाटू लागले. फतुल्ला येथील दुकाने वगैरे सर्व बद झाली

होतीं. अशा स्थितीत कोणास हाक मारल्यास कोणीही दार उघडणार नाहीं व त्याना आपल्याकरिता दुसऱ्यास त्रास देणेही आवडत नसे म्हणून भर पावसातच पुढील रस्ता नागमहाशय चालू लागले वैशाख मास, मेघाचा गडगडाट, पावसाची झड, अधार, यामुळे त्याना फार भय वाटले, फक्त मधून मधून वीज चमके, तिच्या प्रकाशात रस्ता पाहून ते चालत होते. नारायणगजच्या जवळच असलेल्या श्री लक्ष्मी नारायणाच्या देवळाजवळून नागमहाशयाच्या घराचा रस्ता होता त्यावरच एक लहानसे तळे होते. चालता चालता पाय घसरून नागमहाशय त्यात पडले! बाहेर निघण्यासाठी त्यानी पुष्कळ प्रयत्न केले, पण त्याना बाहेर निघता येईना. तळ्याच्या काठी असलेल्या गवताला धरून बाहेर निघण्याचा त्यानीं प्रयत्न केला पण व्यर्थ शेवटीं एकदाचे ते बाहेर निघाले, त्यावेळेस त्याना भगवतीची आठवण झाली. भगवती किती काळजी करीत असेल हा विचार येताच ते जलदीने निघाले व तोडाने रामनाम घेत घेत एकदाचे घरीं येऊन पोहोचले. येण्याची वेळ टळून गेली म्हणून भगवती त्याना मोठ्याने हाका मारीत होती, व हातात कदील घेऊन आत बाहेर येरझाऱ्या घालीत होती नागमहाशय यानी घडलेल्या हकीगतीपैकी काही एक सागितले नाही. ते फक्त म्हणाले " आज रस्त्यात खूप भिजलो, मात्र विशेष त्रास झाला नाहीं."

नागमहाशय मोठे होताच या मातृहीन बालकाचा ससार थाटावा म्हणून, भगवतीने त्याच्या लग्नासबधी खटपट चालविली राइजदा ग्रामातील श्रीयुत जगन्नाथ दास याची ११ वर्षांची कन्या श्रीमती प्रसन्न कुमारी इला वधू नेमस्त करून, तिने त्याप्रमाणे दीनदयाळ यास कलकत्त्यास कळविले. त्याप्रमाणे प्रसन्न कुमारी व नागमहाशय याचा विवाह झाला. प्रसन्न कुमारीला महेश, हरेंद्र व भगवानचद्र या नावाचे तिघे बधु होते जगन्नाथदास याची गृहस्थिति बऱ्यापैकी होती ज्या दिवशी नागमहाशयाचे लग्न झाले त्याच दिवशी त्याची बहीण शारदामणी इचेही लग्न झाले. ( शारदामणीचे सकाळी व नागमहाशयाचे सायकाळी ). विवाहानतर ५ महिन्यानी नागमहाशय कलकत्त्यास येऊन राहिले.

---

# प्रकरण दुसरें.



## कलकत्त्यास आगमन.

कलकत्त्यास आल्यानतर नागमहाशय पितृगृही राहून, क्याम्बेल मेडीकल स्कूलमध्ये वैद्यकीचा अभ्यास करू लागले. परतु त्याची अध्ययनतृष्णा जितकी दाडगी होती तितक्या अशाने ती विशेष फलदायी झाली नाही. येथेही त्यानी १॥ वर्षे अध्ययन केले. कोणत्या कारणाने त्याचे येथे पुढे शिकणे झाले नाही, ते त्याच्या चरित्रातील इतर बऱ्याचशा अप्रसिद्ध गोष्टीप्रमाणे अप्रसिद्धच आहे क्याम्बेल स्कूल सोडल्यानतर त्यानी विख्यात डॉक्टर बिहारीलाल भादुडी याच्याजवळ होमिओपाथीचा अभ्यास सुरू केला. याच्या सरळ चारित्र्याचा डॉक्टर भादुडी याचे मनावर विशेष परिणाम झाला, व त्याची शिकण्याची उत्कट इच्छा पाहून ते त्याना विशेष काळजी-पूर्वक शिकवू लागले अनुभवजन्य ज्ञानाची प्राप्ती व्हावी म्हणून नागम-हाशयास डॉक्टर भादुडी आपल्याबरोबर रोग्याकडेही नेत असत सकाळ सध्याकाळ २ वेळ नागमहाशय डॉक्टर भादुडीकडे शिकण्यास जात असत व इतर वेळी घरी त्याची पुनरावृत्ति करीत. याप्रमाणे २ वर्षे निघून गेली. डॉक्टरी शिकण्याकरिता त्याना बराच काळ कलकत्त्यास रहावे लागले. त्याची पत्नी बहुतेक पितृगृहीच राहात असे यामुळे लग्नानतर पत्नीचा सहवास त्याना विशेषसा घडला नाही. सहवासाचा सुयोग आल्यास पत्नीच्या जवळ जाण्याचेही त्याना भय वाटे. ज्या वेळी ते कलकत्त्याहून घरी येत, तेव्हा पत्नी जर घरी असली तर ते तिच्या सहवासात रात्र घालवावी लागेल म्हणून बाहेर तक्तपोषावर बसून रहात, व भगवती "आज तू माझ्या खोलीत नीज," असे म्हणेपर्यंत तेथून खाली उतरत नसत ! योगमाया या नावाची, दीनदयाळजवळ एक दासी होती तिच्यावर दीनदयाळाचे कन्येप्रमाणे प्रेम होते. तिला नागमहाशय "बोन दिदि" म्हणत. दीनदयाळबरोबर कधी कधी ती देवभोग येथे येत असे. नाग-

महाशयाचे आपल्या पत्नीशीं कसे वर्तन असे, हे सर्व तिने स्वतः पाहिले होते, व तिच्याच मार्फत वरील हकीगत सुरेश बाबूस कळली

बिचारी भगवती नागमहाशयाच्या या विचित्र वर्तनाबद्दल मनाची अशी समजूत करून घेऊ लागली कीं "जरी या वेळेस त्याच्या मनात पत्नीप्रेम नाहीं, तरी ते हळु हळु उत्पन्न होईलच!" परतु हाय! निर्घृण कालाने तिच्या आशेचा भग केला. कारण नागमहाशयाची पत्नी लवकरच आमाश रोगाने मृत्यु पावली व त्याप्रमाणे बातमी कलकत्त्यास येऊन पोहोचली.

पत्नीच्या मृत्यूबद्दल नागमहाशयास वाईट वाटले व एक पक्षीं बरेही वाटले. परमेश्वराने आपले ससारबधन तोडले असे समजून त्यानी मनाचे समाधान केले परतु दीनदयाळ यास या गोष्टीचा फार धक्का बसला. त्याची पत्नी मृत्यु पावली तेव्हा त्याने "आपण आता विवाह करू नये, आपल्या पुत्राचा विवाह झाला म्हणजे आपल्या ससाराची मोडलेली घडी नीट बसेल." असा विचार केला होता, परतु सून मृत्यु पावल्यामुळे त्याची सर्वच निराशा झाली दीनदयाळने पुत्राचा पुन्हा विवाह करण्याचे ठरविले, व त्याच्यासह तो तडक देशी गेला पण मनाप्रमाणे वधु मिळेना. तेथे जास्त दिवस थाबणेही शक्य नव्हते. स्वतःच्या नोकरीची व पुत्राच्या शिक्षणाची त्याला काळजी होती, म्हणून वधु निवडण्याचे कार्य आपल्या जावयावर सोपवून दोघेही कलकत्त्यास निघून आले.

कलकत्त्यास आल्यावर पुन्हा नागमहाशयाचे होमिओपाथीचे शिक्षण सुरू झाले. एक लहानशी औषधाची पेटी विकत आणून नागमहाशयानी आपल्या मोहल्यातील गरीब लोकास औषध देणे सुरू केले.

डॉक्टर भादुडी म्हणत "अनेक असाध्य रोगावर त्याच्या सल्ल्याने दिलेल्या औषधाने गुण आला" औषधयोजना करण्यात त्यानीं फार निपुणता मिळविली होती. नागमहाशयाची सासू एक वेळ कलकत्त्यास आली होती तिने त्याची अप्रतिम औषध-योजना पाहून त्याना प्रत्यक्ष महादेव म्हटले. ज्याना ते जे औषध देत त्याना त्यापासून हटकून गुण

येई. क्रमाक्रमाने त्याचे नाव सर्वतोमुखी झाले वैद्यकीचा व्यवसाय असा जरी त्यानी अजून सुरू केला नव्हता, तरी ते गरीब लोकाना पूज्य वाटू लागले. व त्याच्या घरी रोग्याची गर्दी होऊ लागली. त्यावेळेस त्याची इच्छा असती, तर त्यानी पुष्कळ पैसे मिळविले असते, पण त्यानी त्या वेळेस केलेली औषधयोजना व चिकित्सा धदा म्हणून केली नव्हती, केवळ परोपकार म्हणून केली होती, त्यानी तेव्हा औषधाचा एकही पैसा घेतला नाही. परोपकाराची सुसधी त्यानी कधीही गमाविली नाही. दुसऱ्याकरिता कोणतेही हीन काम करण्यास त्यानी कधी मागे पुढे पाहिले नाही त्याचे बाधव त्याच्याकडून सर्व कामे करून घेत. त्याच्या धान्याच्या गाठोड्या, लाकडाच्या मोळ्या देखील नागमहाशयानी स्वतःच्या डोक्यावर वाहून न्याव्या ! विपदावस्थेत असलेल्यास मदत करण्यास ते सदा तयार असत. प्रेमचाद मुनसी या नावाचे एक गृहस्थ होते. विपुल धन असूनही त्यानी घरी चाकर ठेविला नव्हता. त्याचा एक दूरचा भाऊ होता, त्यालाच सर्व घरकाम करावे लागे. मुनसी महाशय नित्य गगास्नान करीत त्याचा नित्य नेम म्हणजे नागमहाशयाचे घरी येऊन वरचेवर हुक्का तयार करून स्वतः ओढून व तेल मागून घेऊन डोक्यास लावून नतर स्नानास जावयाचे, व मग घरीयावयाचे. याप्रमाणे दिवस जात असता त्याचा भाऊ मरण पावला. प्रेमचाद फार कृपण असल्यामुळे, काही खर्च वेच करावा लागेल, म्हणून तो कोणाशी फार परिचय ठेवीत नसे भाऊ मरण पावला असता, एकहीजण त्याच्या घरी येईना. तो पुष्कळ घरी फिरला पण कोणीच अत्य विधीकरिता आले नाही. शेवटी नागमहाशय व त्याचे वडील यानीच त्याच्या अत्य विधीस मदत करून त्याचे सकट दूर केले

नागमहाशय याचे डॉक्टर भादुडीजवळ १ वर्षभर अध्ययन झाल्यावर त्याची व सुरेश बाबूची ओळख झाली. सुरेश बाबू नागमहाशयास मामा म्हणत असत. हाटखोला येथील प्रसिद्ध दत्त वशात सुरेश बाबूचा जन्म झाला होता. श्रीरामकृष्ण परमहस याची कृपा होण्यापूर्वी ते ब्राम्ह होते. सुरेश निराकारवादी, देव देवमुर्ति व मानणारा, व नागमहाशय कर्मठ व देव द्विज याचे ठिकाणी अत्यत श्रद्धाळू, त्यामुळे दोघाचा नेहमीं कडा-

क्याचा वाद होई. नागमहाशय म्हणत "देव देवी सर्व सत्य व ब्रम्हवादही सत्य, परतु ब्रम्हज्ञान अनेक प्रकारचीं साधन भजने केल्यानतर एखा-द्यालाच होते " व आणखी म्हणत कीं "वेद, पुराण, तत्र, मत्र वगैरे काय सर्व मिथ्या आहे, असे तुमचे म्हणणे ? ब्रम्हज्ञान अतिम साध्य खरे, पण या सर्व पायऱ्या आक्रमण केल्याशिवाय ते होणे शक्य नाहीं. महामायेनें कृपा करून रस्ता दिल्याशिवाय कोणाच्या कृपेने ब्रह्मज्ञान होणार ! " सुरेश उत्तेजित होऊन म्हणे " मामा, राहू द्या तुमचे सर्व शास्त्र बिस्त्र. माझा त्याचेवर विश्वास नाही." परतु नागमहाशयाना देव देवीच्या मुर्तींपुढे साष्टाग नमस्कार घालताना पाहून व त्याची ब्राम्हणाच्या ठिकाणी असलेली अचल श्रद्धा पाहून त्याला वाटे कीं "अशी अचल श्रद्धा असल्यास ब्रह्मज्ञान का प्राप्त होणार नाही ? होईलच यात काही सदेह नाही. " रोज सध्याकाळी सुरेश नागमहाशयाचे घरीं येत असे. व तेथे त्या दोघाचा नित्य वादविवाद चाले पण कोणीच कोणाचे मत ग्रहण करीना. या दोघा परस्परविरोधी स्वभावाच्या पुरुषाचे एक-मेकाकडे कसे आकर्षण झाले कळत नाही, पण प्रथम भेटीपासूनच त्याची गाढ मैत्री जमली होती. त्याची परस्पर भेट होताच ईश्वराव्यति-रिक्त कोणतेही बोलणे होत नसे. सुरेश नागमहाशयास कधी कधी केशव चद्र सेन याचे समाजात नेत असे. केशव बाबूचे वक्तृत्व ऐकून नागम-हाशय मुग्ध होत, पण त्याना समाजातील नियम बिलकूल आवडत नसत. ब्राह्म समाजाने प्रकाशित केलेले " चैतन्य चरित्र " " रूप सनातन " " मुसलमान साधूचा जीवन वृत्तात " वगैरे ग्रथ नागमहाशय मोठ्या प्रेमाने वाचीत. नवविधान समाजातील " आई आम्हाला तुझ्या प्रेमाने वेडे करून टाक, " या अर्थाचे गाणे ते तन्मयतेने म्हणत, पण त्याचा आवाज मात्र मधुर नव्हता

**सुरेश म्हणतो**:—" पहिल्या प्रथमच मला दिसले की, नागमहाशय याचा जीवनक्रम निष्कलक असून लहानपणापासूनच ते सदाचारी व धर्मनिष्ठ आहेत. नागमहाशयानी आजन्म सर्व प्रकारचे देशाचार, कुला-चार, गृहस्थाचार, टाळाटाळी न करता पाळले. लहानपणी त्याना हातीम-

वाईची गोष्ट फार आवडे. विश्वास व ईश्वरानुराग त्याच्या ठिकाणी श्वासोच्छ्वासाप्रमाणें सहज होऊन गेला होता. एके वेळी काहीजण नास्तिक मताचा अभ्यास करून त्याचा प्रचार करू लागले. नागमहाशयाचा व त्याचा कधी कधी कडाक्याचा वादविवाद होई, परतु एखादे वेळेस तर्क दृष्टीने जरी ते पराजित होत तरी म्हणत की " ईश्वर आहे यात तिळमात्र सदेह नाही. " ही त्याच्या पूर्ववयातील कथा. पुढील जीवन क्रमात ते नित्य म्हणत कीं " जी वस्तु आहे, ती साध्य करून घ्यावयाची. त्याला तर्क विचार कशाला? ईश्वर हा सूर्याप्रमाणे स्वयप्रकाश आहे "

ह्या वेळेपासून डॉक्टरकीच्या शिक्षणावरून त्याचे मन उडत चालले. त्याचा बहुतेक वेळ शास्त्रचर्चा करण्यात जाऊ लागला परतु पित्याच्या सागण्यावरून त्यानी डॉक्टर भादुडीकडे जाण्याचे एकदम बद केले नाहीं. नागमहाशय यास सस्कृत भाषा अवगत नव्हती, परतु ज्या शास्त्रावर बगाली टीका झालेली असे, तो ग्रथ मात्र यत्नपूर्वक मिळवून ते वाचीत. एखाद्या पडिताची गाठ पडल्यास ते त्याकडून शास्त्राचे मर्म समजावून घेत. ते नित्य गगास्नान करीत, व एकादशी व्रत पाळीत दररोज सध्याकाळी कुमार टुलीच्या जवळ असलेल्या कागीमित्राच्या स्मशान घाटाकडे फिरावयास जात. कधी कधीं पुष्कळ रात्रपर्यत चितातुर अतःकरणाने तेथेच बसून रहात.

घोर रात्र, प्रेते जळत आहेत, स्मशानातील अश्वत्थ वृक्षाची पाने वाऱ्याने हालताना होणारा आवाज, व जान्हवीच्या प्रवाहाचा गभीर नाद हे दोन्ही एकत्र होऊन जणू काय जीवन मरणाचे करुणापूर्ण गाणे गात आहेत! अथवा ते गाणे तरी कसचे? कारण त्या गाण्याला ना शद्ब ना अर्थ! तरी पण ते नुसते सूरच हृदयाला भेदीत आहेत! अशा वेळी नागमहाशय तेथे बसून विचार करीतः—"हे सर्व चराचर अनित्य असून एक ईश्वर मात्र सत्य आहे, त्याचा लाभ जर या जन्मी करून घेतला नाहीं, तर जन्माला येण्याचा उपयोग काय? त्याचा लाभ कसा होईल? कोण मला त्याच्या प्राप्तीचा मार्ग दाखवील?"

काशीमित्राच्या स्मशानात कधी कधी साधू सन्याशी साधक येत. त्याची नागमहाशय व्याकुळ अतःकरणाने प्रार्थना करित, पण कोणीच त्याच्या प्रश्नाचे उत्तर दिले नाही. तेव्हा नागमहाशय याच्या नजरेस आले की, पुष्कळ साधक सिद्धीच्या पाठीमागे आहेत, त्याचे ध्येय पराभक्ति नव्हे एक दिवस एका तान्त्रिकाची व त्याची वरील स्मशानात भेट झाली, वामाचार साधना कोणत्या प्रकारे करावी म्हणून त्यास त्यानी विचारले असता त्यानी कैक बीभत्स प्रकाराचे वर्णन सुरू केले त्याची ती व्याख्या ऐकून नागमहाशय त्यास म्हणाले की "आपणास अजून पुष्कळ विचार व अभ्यास केला पाहिजे. आपणाला तत्रमार्गाचे मर्म काहीच कळले नाही." वरील प्रकारचे साधू पाहून धर्मासबधीची आस्था वाढणे एकीकडेच राहून त्याचे मन सशयग्रस्त होऊ लागले. त्याची एका ब्राह्मणावर मात्र श्रद्धा जडली. सदरहू ब्राह्मणाने तान्त्रिक सन्यास घेऊन स्मशानात साधना सुरू केली होती. त्याचा स्वभाव उदार होता त्याच्यात भेदबुद्धि बिलकुल नव्हती व तो अतर्दृष्टि सपन्न होता. साधन ग्रथात सागितल्याप्रमाणे नियमितपणे तो मद्याचेही सेवन करीत असे. तान्त्रिक साधनाचे गूढ मर्म व षट्चक्र रहस्य अति सरळपणे विशद रूपाने त्यानें नागमहाशय यास सागितलें. तत्र मार्गाचे अनुसरण करण्याचा आपला भाव नागमहाशयानी प्रकाशित करताच वृद्ध ब्राह्मणाने आशिर्वाद-पूर्वक त्याला समति दिली, व म्हणाला की "भगवती जगदबा तुझी सर्व वासना पूर्ण करील." या साधकासबधी नागमहाशय म्हणत की "तो ब्राह्मण साधनाच्या योगाने फार उच्च अवस्थेला पोचला होता, व शेवटी देहभानावर असताच गगेत बसून त्याने देहत्याग केला!"

वरील वृद्ध ब्राह्मणाच्या उपदेशानुरोधे नागमहाशय कधी कधी घोर रात्री स्मशानात जप, ध्यान करीत. एक दिवस ध्यान करिता करिता त्यास शुभ्र ज्योतीचे दर्शन झाले व तेव्हापासून ते नियमितपणे स्मशानात जाऊन जप ध्यान करू लागले.

वरील गोष्ट काही दिवसानीं दीनदयाळच्या कानावर आली तेव्हा त्याना फार वाईट वाटले. त्यानीं आपल्या जावयाला नागमहाशयाकरिता

बाबडतोब वधू नेमस्त करण्यास पत्र लिहिले. दीनदयाळला वाटले कीं, पुत्राचे वय तरुण, कांहीं बधन नाहीं, तेव्हा तो साहजिकच साधू सन्यासी याच्यामागे स्मशानात भटकतो. लग्न झाल्यावर हे सर्व आपो-आप बद होईल देवभोगनिवासी रामदयाळ भुइरा याची ज्येष्ठ कन्या श्रीमती शरत् कामिनी इला दीनदयाळच्या जावयाने वधु निश्चित केली व त्याप्रमाणे पत्र लिहिले दीनदयाळने आपल्या पुत्राजवळ लग्नाची गोष्ट काढताच नागमहाशय म्हणाले " पुन्हा विवाह न करण्याचा माझा निश्चय झाला आहे." नानाप्रकारे समजूत घालण्याचा दीनदयाळने प्रयत्न केला पण व्यर्थ. एक दिवस बोलता बोलता गोष्ट निकरावर आली, दीनदयाळने त्या दिवशी काही खाल्ले नाहीं म्हणून नागमहाशयानीही उपवास केला. याप्रमाणे दिवस जात चालले. दीनदयाळ म्हणाला "तुझ्याकरिता एका सद्गृहस्थाशी या उतार वयात वचनभग करण्याचा प्रसग मला आला !" नागमहाशय म्हणाले, 'तुम्ही एकदा माझे लग्न करून दिले, पण ती तर बिचारी मरण पावली आता कोणाची कन्या आणून मृत्युमुखी द्यावयाची आहे ? " दीनदयाळ म्हणाला " ज्याच्या नशिबात जे असते ते होते. पिता या नात्याने माझी आज्ञा ऐकलीस तर तुझे कधींही अमगल होणार नाही. न ऐकशील तर "तुझी धार्मिक उन्नति न होवो" असा मी तुला शाप देईन. "

हे ऐकून नागमहाशय फार विचारात पडले. एकीकडे पित्याचा शाप दुसरीकडे धर्म मार्गच बद होण्याची भीति ! स्त्रीसग तर नरकाचे मूळ आणि त्याचकरिता पित्याचा आग्रह ! हाय भगवान ! कसे होणार ? एक दिवस करुण स्वराने नागमहाशय आपल्या पित्याला म्हणाले " बाबा ! पहा या विवाहामुळेच सर्व आपत्ति उत्पन्न होतात, आपण कृपा करा मला या पाशात अडकविण्याचा विचार बाजूस ठेवा, मला अडकवू नका. ( आपण हयात असेपर्यंत ) घरात सून आल्याने, ती जी काही आपली सेवा करील, त्यापेक्षा जास्त सेवा काया वाचा मने करून मीं करीन, माझ्यावर दया करा- "

पुत्राचे म्लान मुख व करुण वाक्य ऐकून दीनदयाळला फार दुःख

झाले, व त्याच्या मनात आले की, "लग्नापासून ज्याला सुख होईल म्हणून मी म्हणतो त्याला जर दुःख होते, तर हा खटाटोप कशाला?" पुन्हा त्याच्या मनात आले कीं ' दुर्गाचरण जर विवाह करणार नाही, तर आपला निर्वंश होईल व आपली क्रियाकर्मे मग कोण करील ? या विचारानें दीनदयाळचे मन अस्थिर झाले, परतु उपाय काय ? नागमहाशयानीं विवाहाला समत व्हावे म्हणून दीनदयाळने केलेले सर्व उपाय थकले. नागमहाशय विवाहाला समत होईनात त्यामुळे दुःखी होऊन एक दिवस दीनदयाळ एकातात रडू लागला नागमहाशय त्या वेळेस घरीं नव्हते. घरीं आल्यावर पाहातात तो आपले वडील रडत आहेत ! हे पाहून त्याच्या मनाला फार वाईट वाटले व ते विचार करू लागले की ' वडिला-शिवाय या ससारात माझे म्हणून मला कोण आहे ? कोणी नाहीं. हाय हाय ! माझ्याकरिताच ना त्याना एवढे दुःख ? आग लागो त्या धर्माला आणि कर्माला. आजपासून मी पित्याची आज्ञा पालन करणार मीं विवाह केल्याने जर पिता सुखी होत आहे, तर मी विवाह करणार." असा विचार करून नागमहाशय वडिलाजवळ येऊन म्हणाले " बाबा, मी विवाह करितो "

प्रथम तर ही गोष्ट दीनदयाळच्या कानात शिरलीच नाहीं ते पहिल्या-सारखेच अश्रुयुक्त नेत्रानी नागमहाशयाचे मुखाकडे पहात राहिले. नागमहाशय पुन्हा म्हणाले " बाबा विवाहची तिथि ठरवून त्याप्रमाणे घरी पत्र लिहा. " हे अनपेक्षित शब्द ऐकून दीनदयाळचे हृदय भरून आले, तो गद्गद कठाने म्हणाला " तू माझा मान राखलास, त्याने धर्म-रक्षण झाले. विवाह झाल्यावर तू आपल्या मनाप्रमाणे वर्तन कर, मी तुला काहीही बोलणार नाही. मी अतःकरणपूर्वक आशिर्वाद देतो कीं, ईश्वर तुझी मनोवाञ्छा पूर्ण करो ! " असे म्हणून दीनदयाळ पाल बाबूच्या घरीं हे शुभ वर्तमान सागण्यास गेला. पालबाबूनीं विवाहाची बातमी ऐकून आनद प्रदर्शित केला व बराच खर्च स्वतः करण्याची इच्छा प्रदर्शित केली. याप्रमाणे सर्वांना आनद झाला पण ज्याचा विवाह

व्हावयाचा त्याच्या हृदयात मात्र दुःखाग्नि भडकला. पित्याला विवाहाची समति देऊन नागमहाशय घराबाहेर पडले

सारा दिवस त्यानी फिरण्यात घालविला, व रात्री गगेच्या काठी बसून ते व्याकुळ अतःकरणाने रडू लागले. व्यथेला औषध नाही मनाच्या वेदना कोणाला सागाव्या ? साऱ्या दिवसात त्यानी काहीही खाल्ले नाही. दीनदयाळला हे काहीच माहीत नव्हते, कारण त्याने तिथी-निश्चय करुन घरी पत्र पाठविले होते, व तो आवश्यक वस्तूच्या खरेदीत गुतला होता. सर्व वस्तूची खरेदी झाली, फक्त पोषाक घ्यावयाचा राहिला. दीनदयाळने नागमहाशयास आपल्या आवडीने पोषाक खरेदी करण्यास सागितले,पण त्यानी ते नाकबूल केल्यावरून तेही काम दीनदयाळनेच केले

आज देशी जावायचा दिवस. दीनदयाळची बाधाबाध सुरू झाली नागमहाशय सध्याकाळी नित्य गगातटाकी फिरावयास जात, त्याप्रमाणे आजही गेले. घरी परतण्यापूर्वी गगामातेला त्यानी नमस्कार केला व हात जोडून म्हणाले " आई ! तू पतितपावन आहेस म्हणून मी ऐकिले आहे ससार आश्रमात शिरल्यावर जर माझ्या अगाला अपवित्र-तेचा चिखल लागला, तर आई ! तो धुवून टाक. सपत्काळी तसेच विप-त्काळी या दासाला तुझ्या चरणी आश्रय दे ! " येणप्रमाणे प्रार्थना करून ते घरी आले व पितापुत्र देशी जाण्याकरिता निघाले.

# प्रकरण तिसरें.



## पुनर्लग्न व वैद्यकीचा व्यवसाय.

विवाहासंबंधाने नागमहाशय म्हणत असत "केवळ वंशवृद्धीकरिता विवाह केल्यास दोष लागत नाहीं परंतु केवळ याच उद्देशाने विवाह करण्यास पूर्वीचे ऋषी मुनीच योग्य आजन्म ब्रह्मचर्य पालन करून वंश-वृद्धीकरिताच ते विवाह करीत आणि व्यास शुकदेव, सनक, सनत्कु-मार यांच्यासारख्या पुत्रांना जन्म देऊन, अंती संसारत्याग करून वान-प्रस्थ आश्रम स्वीकारीत परंतु ह्या कलियुगात तसे होणें कठीण, कारण तेव्हासारखी हल्ली तपस्या नाही. म्हणून केवळ विकारामुळेच जन्मलेले पुत्र सहजच दुर्बल व दुष्ट बनतात" व नंतर आपल्या दुसऱ्या लग्नाचा उल्लेख करून म्हणत "काय करावे? विवाह विषवत् वाटत असूनही पित्याची आज्ञा म्हणून मला तो करावा लागला."

विवाहापूर्वी ४—५ दिवस दीनदयाळ व नागमहाशय आपल्या गावी येऊन पोहोचले. दिवस भराभर जाऊन लग्नाचा दिवस उगवला व दीन-दयाळ वाद्यांच्या गजरात वरास घेऊन चालला. वधूचे घर जवळच होते निर्विघ्नपणे लग्नसोहळा पार पडला, व नागमहाशयांची पुन्हा लग्न न करितां ईश्वर लाभाकडे आयुष्य वेचण्याची इतक्या दिवसाची इच्छा जागच्या जागीच राहिली विधात्याच्या इच्छेनुसार विवाह-बद्ध झाल्यामुळे आता साहजिकच द्रव्योपार्जन केले पाहिजे, असे त्यांना वाटू लागले. पहिल्या-पासूनच त्यांना चाकरीचा कंटाळा असल्यामुळे, त्यांनी वैद्यकीचा स्वतंत्र धंदा करून निर्वाह करण्याचे ठरविले विवाहानंतर पितापुत्र परत कल-कत्त्यास आले. तेव्हापासून त्यांनी व्हिजीट घेऊन औषधयोजना करणे सुरू केले. अध्ययन, रोग्यांची शुश्रूषा, परिचितांशी प्रेमळ भाषण व ईश्वरी कथा यांत त्यांचा काळ जाऊ लागला, पण त्यांच्या ह्या सुखात एक विष कालविले गेले, ते हे की भगवती दासी आजारी आहे अशी गावाहून

बातमी येऊन पोहोचली. एक तर तिचे वय झालेले व त्यात आमाशासारखा रोग झालेला नागमहाशय उद्विग्न अंतःकरणाने गावी येऊन पोहोचले. नागमहाशय भगवतीजवळ जाऊन पोहोचताच ती परम आल्हादाने म्हणाली "तुझे मुख पहाता पहाता मला मरण येत आहे हे माझे परम भाग्य आहे." नागमहाशयानी तिची पुष्कळ शुश्रूषा केली पण व्यर्थ. मरणापूर्वी तिने नागमहाशयास जवळ बोलावून सर्वांचे जेवण झाले कीं नाहीं याची चवकशी केली, व पडवीत रामनामाचा जप करीत बसली. नंतर म्हणाली " आता वेळ संपत आली. " नागमहाशयास " तुझे 'रामचरणी' मन राहो " असा तिने आशिर्वाद दिला, व हेच तिच्या मुखातले शेवटचे वाक्य भगवतीने राम मंत्राची दीक्षा घेतली होती. मरण समयी 'रा' येवढेच नागमहाशयाच्या कानी पडले व तिची प्राण-ज्योत मालवली. नागमहाशयाच्या द्वितीय विवाहानतर सात वर्षांनी भग-वतीचा अंत झाला. शोक कशाला म्हणतात, याची इतके दिवस नागम-हाशयास कल्पनाच नव्हती. पहिल्या पत्नीवर त्याचे प्रेमच बसले नव्हते, तेव्हा तिच्या निधनाचा शोक त्याना जाणवला नाही. बाल्यकाली माता मरण पावली पण तिच्या ठिकाणी भगवती प्रेमस्थान झाल्यामुळे, मातेच्या मरणाचे दुःख त्याना तितके जाणवले नाही. आज मातृस्थानी असलेल्या भगवतीच्या मृत्यूने मात्र त्याना भयंकर आघात बसला. घरी रहाणे त्याना असह्य झाले. वरचेवर ते भगवतीच्या चिताभूमीवर जात व तेथेच रात्रभर पडून रहात, किंवा जगलात रात्र घालवीत! त्याची धाकटी बहीण शारदा म्हणे—" भगवतीच्या मृत्यूने दादा उन्मत्त बनत चालला. त्याला बोलावून स्नान व खाणें करवावे लागे. कधी कधीं जगलाच्या पश्चिमेच्या बाजूला तो एकाद्या प्रेतासारखा निश्चेष्ट पडून रहात असे. म्हणून कलक-त्त्यास पत्र पाठवून दीनदयाळला बोलावून घ्यावे लागले."

भगवतीचे श्राद्धादि कार्य आटोपून नागमहाशय पित्यासह कलकत्त्यास आले. शोकावेग क्रमाने कमी झाला खरा, पण त्याना दुसरी चिंता लागली. " मनुष्य का जन्माला येतो ? का मरतो ? मरणानतर त्याची स्थिति काय होते ? भगवती कोणत्या लोकाला गेली ? तिचे काय झाले ?" हे विचार

रात्रदिवस त्याच्या मनात घोळू लागले. " जी भगवती माझ्या अगाला काटा बोचताच दु:खित होई, तिच्याकरिता मी किती शोक करितो, किती विचार करितो, पण ती एकदा देखील फिरून दिसत नाही. मरणानंतर जर सर्व संबंधाची इतिश्री होते, तर या क्षुद्र देहाचे 'माझे माझे' म्हणून का चोचले करावे? या जन्ममृत्यूपूर्ण ससारात मीं कशाला जन्म घेतला? मनुष्य जन्माचे काय कर्तव्य आहे? " नागमहाशय रात्रदिवस ह्याच विचारात निमग्न रहात.

नागमहाशयानी जरी पैसा घेऊन वैद्यकीचा व्यवसाय सुरू केला होता, तथापि अमुकच फी घेईन असा त्यानी कधीच आग्रह धरिला नाही. स्वसतोषाने जो जे काही देई तेवढ्यातच ते सतुष्ट रहात, म्हणून त्याचा व्यवसाय बराच वाढला. धंद्याच्या दृष्टीने नागमहाशयाचे बिलकुल अवडबर नव्हते. गाडी घोडा तर राहिलाच पण त्यानी निराळे औषधालय देखील स्थापन केले नाही. पुष्कळ अतरावरचे जरी त्याना बोलवणे आले, व जरी गाडी करण्याची कोणी इच्छा दर्शविली, तरी त्याचे म्हणणे न ऐकिता, ते पायीच जात असत त्याचा पोषाक अगदी सामान्य दर्जाचा होता. धंद्याच्या दृष्टीने योग्य पोषाक असल्यास व्यवसायाची आणखी वाढ होईल म्हणून दीनदयाळने त्याच्याकरिता एक चागला पोषाक करविला परतु नागमहाशय म्हणाले " या पैशानी गरीब व दु:खी जनाची सेवा केली असती तर फार उत्तम झाले असते मला असला पोषाक नको ! " हे ऐकून दीनदयाळने एक दीर्घ निश्वास सोडून म्हटले " तुझ्यावर माझ्या पुष्कळ आशा होत्या, पण काय उपयोग ? मला आता समजले, की मी तुझ्या बाबतीत सपशेल फसलो, कारण तू तर फकीर होत चाललास. केवळ एवढेच नाही, तर ससार म्हणजे काय हेही तुला कळत नाही. तुझे सर्वच काहीं सृष्टीविरहित दिसते. " आपल्या आळीत कोण दुःखी आहे, कोण अन्नावाचून उपाशी आहे, याची चवकशी करून त्याला शक्य ती मदत केल्याशिवाय नागमहाशय तोंडात पाणी घालीत नसत. ज्याना व्हिजीटचे पैसे देण्याचे सामर्थ्य नाही त्यापासून ते पैसे घेत नसत, स्वखर्चाने औषधाचेही पैसे न घेता त्याच्या पथ्या-पाण्याची सोय करीत. रस्त्याने निराश्रित रोगी दिस-

त्यास त्याला आपल्या घरी आणून त्याची ते सर्व व्यवस्था करीत. एकाद्या भिकाऱ्यास स्वत.चे पुढचे अन्न उचलून देत असे त्याचे सर्वच काही विलक्षण होते. एक दिवस एका गरीब रोग्याच्या घरी नागमहाशय गेले. त्याला तपासून झाल्यावर औषधयोजना केली. त्याची स्थिति अत्यवस्थ होती म्हणून ३–४ तास तेथे राहून त्यानी त्याची शुश्रुषा केली व रात्री पुन्हा त्यास पहावयास गेले. थडीचे दिवस, घर चद्रमौळी थडीपासून बचाव होण्यासारखे रोग्याच्या अगावर वस्त्रही नव्हते अशा थडीत हा रात्रभर राहिल्यास वाचणे कठीण, म्हणून त्यानी आपल्या अगावरचे वस्त्र त्याच्या अगावर घालून घरचा रस्ता धरला रोग्याने त्याना परत फिरण्या-बद्दल पुष्कळ हाका मारिल्या, पण ते परत फिरले नाहीत. दरवाजाबाहेर पडता पडता म्हणाले "भिऊ नकोस, मी उद्या पुन्हा पहावयास येईन." दुसऱ्या दिवशी त्या रोग्याच्या इथे जाताच त्याने कृतज्ञतापूर्वक त्याचे आभार मानिले नागमहाशय म्हणाले "माझ्यापेक्षा तुला कपड्याची गरज अधिक होती म्हणून मी तुला ते दिले, यात अधिक ते मी काय केले ?" पुत्राच्या अगावर वस्त्र नाही हे पाहून, दीनदयाळने त्या बाबतीत त्यास विचारले असता, त्यानी सर्व हकीगत सागितली, ती ऐकताच दीनदया-ळने त्याना अद्वातद्वा बोलण्यास सुरवात केली, व त्याचा परिणाम असा झाला की पितापुत्र दोघेही त्या दिवशी उपवाशी राहिले. दुसऱ्या दिवशी दीनदयाळने पुन्हा नवे वस्त्र आणून दिले. जे रोगी नागमहाशयाच्या हस्ते रोगमुक्त झाले होते ते नित्य येऊन त्याना वदन करीत, व आपल्या ओळखीचे कोणी आजारी पडल्यास त्यास त्याच्याकडे घेऊन येत

आणखी एक दिवस ते असेच एका रोग्याकडे गेले असता त्याना आढळून आले की, रोगी जमिनीवरच पडला आहे. हे पाहताच ताबडतोब घरी जाऊन त्यानी आपल्या घरची खाट आणून, त्यावर त्या रोग्याला निजविले, व त्याची तपासणी सुरू केली. दीनदयाळला या सर्व गोष्टी बिलकुल आवडत नसत. एका लहान अर्भकाला पटकीचा आजार झाला. नागमहाशय त्याजवळ सर्व दिवस बसून होते अखेरीस ते मूल मृत्युवश झाले. सुरेश म्हणतो "त्या दिवशी त्याना पुष्कळ पैसे मिळाले असतील

असे मला वाटले, पण काय ? सध्याकाळी ते हात हलवीत परत घरी आले व शोक करू लागले की "हाय हाय! त्या गृहस्थाचे ते एकुलते एक मूल होते, पण ते वाचू शकले नाही ! त्या बिचाऱ्याचे घर शून्य झाले !" त्या दिवशी त्यानी तोडात पाणी देखील घातले नाही

नागमहाशयाचा व्यवसाय वाढतच होता. पालबाबूनी त्याना आपले घरी कायमचे वैद्य नेमिले होते, म्हणून पालबाबू त्याना नेहमी डॉक्टर म्हणत बाबू हरलाल पाल म्हणतात ' नागमहाशय जोपर्यंत आमचे घरगुती वैद्य होते, तोपर्यंत आमच्या घरी एकही अपमृत्यु झाला नाही. एके वेळी त्याच्या आप्तातील एक स्त्री पटकीने अत्यवस्थ आजारी पडली. नागमहाशयाचे औषधोपचार सुरू झाले. परतु औषधाचा उपयोग न होता रोग दिवसेदिवस बळावत चालला. तेव्हा त्यानी डॉक्टर भादुडी यास आणावयास सुचविले त्याप्रमाणे डॉक्टर भादुडी आल्यानतर त्याना काय काय औषधोपचार झाले ते सागितले. ते ऐकून डॉक्टर भादुडी म्हणाले " उपचार अगदी योग्य चालू आहेत, मी यापेक्षा जास्त काही करू शकत नाही " पालबाबूनी आग्रह धरला पण डॉक्टर भादुडीनी ऐकिले नाहीच, उलट, रोगी या वैद्याचे हातून त्या वैद्याचे हातात, असे न करण्याबद्दल त्याना बजाविले. नागमहाशयाच्या परिश्रमाने रोग्याला आराम पडू लागला व पालबाबूची नागमहाशयावरील श्रद्धाही वाढली त्यानी कोणत्याही प्रसगी पुढे कोणाच इतर वैद्याला बोलाविले नाही. ते नागमहाशयावरच पूर्ण विश्वास ठेवून रहात. त्या स्त्रीला पूर्ण आरोग्य प्राप्त होताच पालबाबूनी एका रुप्याच्या गोल डब्यात रुपये भरून ती त्याना दिली. पालबाबूचे आपण आश्रित म्हणून नागमहाशय कधीही पालबाबूजवळून व्हिजिट फी घेत नसत. म्हणत " जे काय द्यावयाचे आहे ते बाबाजवळ द्या." त्याप्रमाणे त्यानी तो रुप्याचा डबा व रुपये यापैकी काहीही घेतले नाही. पालबाबूना वाटले की योग्य सत्कार झाला नाही म्हणून नागमहाशय घेत नाहीत, म्हणून त्यात आणखी ५० रुपये घालून नागमहाशयास ते घेण्यास विनवू लागले, तेव्हा नागमहाशय म्हणाले "औषधाची किमत व व्हिजिट फी मिळून बिल २० रुपयावर झाले नाही." पालबाबूनी फारच

आग्रह धरल्यावरून २० रुपये फक्त त्यानी घेतले. बाकी राहिलेले रुपये पालबाबूनी श्रीशारदादेवीच्या पूजेकरिता म्हणून दीनदयाळच्या नावे जमा करून घेतले.

वरील हकीगत जेव्हा दीनदयाळ यास पालबाबूकडून कळली तेव्हा त्याचे धैर्य गळाले उदरभरणासाठी आपल्याला या उतार वयात नोकरी करावी लागते, आणि आपला व्यवहारशून्य पुत्र हक्काच्या प्राप्तीचीही उपेक्षा करितो याचे त्याना वाईट वाटले, परतु उपयोग काय? त्याची दीनदयाळने पुष्कळ निर्भर्त्सना केल्यावर नागमहाशय म्हणाले "तुम्हीच तर मला धर्ममार्गाने वागण्याचा उपदेश केला मी जाणून बुजून पैसे जास्त कसे घेऊ? औषधाचे सहा रुपये व व्हिजिटचे १४ एकदर खरे २० रुपये झाले तेवढे मी आणिले. जास्त पैसे घेतले असते तर अधर्म घडला असता, म्हणून आपणही बाकीचे पैसे ग्रहण करू नका." दीनदयाळ म्हणाला "बाबू जर खुष होऊन तुला बाकीचे पैसे त्यानी इनाम दिले, तर तू ते घेणार नाहीस काय? अशा रीतीने तुझा व्यवसाय कधीच चालणार नाही" नागमहाशय म्हणाले "न चालो बिचारा, जी गोष्ट मला अयोग्य वाटते ती मी प्राणातीही करणार नाही. ईश्वर सत्य—स्वरूप आहे. खोट्या मार्गाने वागल्याने मनुष्य इहपरलोकाला आचवतो." हे उत्तर ऐकून दीनदयाळला वाटले की आपला पुत्र कधीही ससारात सपन्न होणार नाही इकडे नागमहाशय विचार करू लागले "हाय हाय! यालाच म्हणतात ससार. या भवारण्यात अनीतीने पैसा मिळविणे म्हणजेच मोठे शतकृत्य समजतात, व त्यालाच मान मान्यता मिळून ते 'यश' या नावाने सबोधिले जाते. अशा प्रकारच्या ससाराची मला गरज नाही. सन्मार्गाने राहून भिक्षावृत्तीवर उपजीविका करणे पत्करीन, परतु या अनित्य देहाला पुष्ट करण्याकरिता, अधर्माच्या मार्गाने द्रव्योपार्जन करण्याच्या निंद्य मार्गाचे अवलबन कधीही करणार नाही."

नागमहाशयाच्या व्यवसायाच्या वाढीनुरूप जर त्यानीं द्रव्यतृष्णा धरली असती, तर त्याचे जवळ हजारो रुपये जमले असते. परतु ज्या ठिकाणीं ३००—४०० रुपये मिळणे उचित व शक्य असे, अशा

ठिकाणी ते फक्त ३०–४० रुपयेच घेत व्हिजिट फी म्हणून त्यांनीं कधीच कोणाजवळ मागितली नाहीं जे काही कोणी देत असत, तेच प्रसन्न अतःकरणाने घेत व्यवहारात ज्याना चतुर म्हणून सबोधिले जाते असे लोक शक्य तितके त्याना ठकवित कधी रोगाचे निदान करून घेऊन व्हिजिट फीही देत नसत कोणी उधार औषध घेत पण पैशाची फेड मात्र करीत नसत. सुरेश म्हणतो'—मामा रोग्याकडून परत येण्याच्या वेळेस पहावे तो घरी ४-५ जण पैसे मागणारे बसलेलेच आहेत कोणी काही मागितल्यास ते नाही म्हणत नसत म्हणून कधी कधीं प्राप्ती होते तोच ती लोकाना वाटून देऊन स्वस्थ होत. यामुळे कधी कधी त्याना अन्नाची भ्रात पडे अशा वेळी २ पैशाचे फुटाणे खाऊन ते दिवस काढीत उधार औषध नेणारे लोक, पैसे देणे लाबच राहो उलट म्हणत की "तुम्हाला काय कमी आहे, ८-१० रुपये रोज मिळतात, ईश्वर आणखी देईल."' स्वतःजवळ नागमहाशय एक पैसा देखील ठेवत नसत. जे काय मिळेल ते दीनदयाळजवळ देत आपल्याला काही कपडे करणे असले तर पित्याला सागत सचयाच्या बाबतीत नागमहाशय म्हणत "जेव्हा ज्याला ज्याची गरज आहे, तेव्हा ईश्वर त्याला ते देतोच मनुष्याने चिता करणे व्यर्थ आहे. ईश्वरावर सर्व भार ठेविला तर सर्व काही सुरळीत चालते. आपण अह बुद्धीने जे करू जातो, परिणामी तेच आपला घात करिते, हे मी आपल्या डोळ्यानी पाहिले आहे

नागमहाशय अधर्मी, कपटाचारी व ढोंगी याना कधीही थारा देत नसत. एक दिवस एक नवयौवनसपन्न तरुण वैष्णवी व वैष्णव वेषधारी एक तरुण युवक, त्याच्या घरी भिक्षा मागण्यास आले. त्यावेळी नागमहाशय भगवत् चितनात मग्न होते. दरवाजाशी "राधे राधे" अशी आरोळी कानी पडताच ते बाहेर आले. वैष्णव वैष्णवीला पाहून त्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोहोचली, व ते म्हणाले "अशा सोगाने "राधे राधे" म्हटल्याने भिक्षा मिळणार नाही, जर एक वेळ अतःकरणापासून म्हणशील तर मिळेल." वैष्णव दापत्य काहीही न उत्तर देता चालते झाले. नागमहाशय मनात म्हणाले "हायहाय! आज मी प्रत्यक्ष कलिकाल

पाहिले हेच तर पृथ्वीचा ग्रास करीत आहेत ' वैष्णव वैष्णवीप्रमाणे एक दिवस एक भैरव वेषधारी एका भैरवीला घेऊन भिक्षा मागण्यास आला. त्रिशूलधारी भैरव नागमहाशयास पाहून गाजाकरिता पैसा द्या म्हणाला. नागमहाशय त्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून त्याला म्हणाले " आपणास जे वाटेल ते आपण करा, पण एका कुलवती तरुणीला भैरवीचा वेष देऊन राजरस्त्याने फिरण्याला कोणत्या शास्त्राची सर्मात आहे हे मात्र तुम्ही मला समजावून दिले पाहिजे " हे ऐकून उग्र वेषधारी भैरव अधिकच उग्र होऊन म्हणाला " तुम्हाला द्यावयाचे असेल तर काही द्या, उगीच शिवीगाळ का करिता ? " असे म्हणून भैरव भैरवींनी रस्ता सुधारला. नागमहाशय म्हणत " चागला गुरू नसला म्हणजे साधारण जनतेची अशी दुर्दशा होते ढोगी गुरू स्वतः बुडतो व दुसऱ्यालाही बुडवितो " ते म्हणत " अजाणता लोक जे काही करितात त्याबद्दल त्याना क्षमा मिळते. पण धर्माच्या नावाखाली एखादी व्यक्ती जर ढोग, कपटाचार व व्यभिचार करील, तर कल्पातीही त्याचा उद्धार होण्याची आशा नाही "

एके वेळी त्याना एका सद्‌गृहस्थाकडचे बोलावणे आले. तेथे गेल्यावर एका सुदर तरुण विधवेचा गर्भ नष्ट होण्याचे औषध देण्याबद्दल त्याने त्याना विनविले! हे ऐकून नागमहाशय स्तंभितच झाले व म्हणाले, "इला तर कोणत्या तरी चागल्या कुळातून पळवून आणलेली दिसते, हे एक महा-पाप, व आता पुन्हा भ्रूणहत्येचे दुसरे पातक करण्यास तुम्ही उद्युक्त झालात-शिव शिव !" पण उलट तो गृहस्थ पैशाची लालूच दाखवून ते कार्य करण्यास विनवू लागला शेवटी नागमहाशय तेथून निघून आले "या पाप-निवारणाला उपाय काय करावा?" असा विचार करता करता त्याना ब्रह्म-समाजातील उपाचार्य शिवनाथ याची आठवण झाली. त्यांची व्याख्याने त्यानी ऐकिली होती. शिवनाथ धार्मिक व प्रतिष्ठित. त्याचेकडे गेले असता या पापकार्याचे निवारण होईल, असा विचार करून नागमहाशय शिव-नाथकडे गेले. शिवनाथानी एक दोन उपदेशाच्या गोष्टी सागितल्या, व कायद्याचा आश्रय घ्यावा वगैरे प्रकारची सल्ला दिली. ब्राह्मभक्ताची मदत निष्फल आहे असे वाटताच, त्यानीं स्वतः कार्य करण्याची कबर बाधली

व दुसरे दिवशी ते त्या सद्गृहस्थाच्या घरी गेले, तो काय ? सर्व जण काशीला गेले म्हणून कळले या पातकाचा प्रतिकार आपण करू शकलो नाही. म्हणून बरेच दिवस नागमहाशय स्वतःवरच सतप्त होत, व मध्ये मध्ये स्वतःचा धिःकार करीत

पैशाची साधारण बरी स्थिति असूनही दीनदयाळने घरी स्वयपाकी ठेविला नव्हता तो स्वतः स्वयपाक करी पित्याला स्वतःला स्वयपाक करिताना पाहून, त्याना त्रास होऊ नये म्हणून, नागमहाशय अवसर मिळताच स्वयपाक तयार करीत त्यामुळे दीनदयाळ त्याच्यावर रागावत असे पुत्राला स्वयपाक करण्याची सवडच देऊ नये म्हणून दीनदयाळ ज्यास्त दक्षता ठेवू लागला. पुत्र स्वयपाक करण्याची संधी डोळ्यात तेल घालून पहात असे! या स्वयपाकाच्या बाबतीत पिता—पुत्राचे भाडण होत असे कधी कधी हजर असलेल्या लोकाना त्याचे भाडण मिटवावे लागे! पण काय उपयोग ? दुसऱ्या दिवशी पुन्हा तेच दोघेही प्रातःकाळी मनात "आज आपण स्वयपाक करू" म्हणून विचार करीत. परतु ज्याची इच्छा अपूर्ण राही, त्याला रागाचा झटका येत असे नित्य होणाऱ्या या वादाचा निकाल लावण्याच्या उद्देशाने नागमहाशयानी आपल्या पत्नीला आणविण्याचे ठरविले, व त्यासाठी सुरेश बाबूच्या घराजवळ असलेले दुमजली लहानसे घर भाड्याने ठरविले. कारण एक मजला लहान असल्यामुळे पुरेसा नव्हता. इ स. १८८० मध्ये नागमहाशयाची पत्नी आपल्या पतीची व श्वशुराची सेवा करण्यास कलकत्यास येऊन पोहोचली. तिला ससाराचा हा पहिलाच अनुभव होता. पितृगृही असता तिला पतीचे दर्शन झाले नव्हते असे नाही, पण हा प्रकार अर्थात् त्याहून भिन्न होता. तेव्हा ती वधू होती. हल्ली गृहिणी झाली होती. कलकत्त्यास आल्यावर आपल्या शक्त्यनुसार तिने आपल्या पतीची व श्वशुराची सेवा सुरू केली दीनदयाळला सुख झाले खरे, पण पत्नी पतीचे मन मात्र आकर्षण करू शकली नाही. "पतीची जितकी ईशभक्तीवर अनुरक्ती आहे तिच्या शताशही आपल्यावर नाही," हे तिच्या नजरेस आल्यावर तिला अतिशय वाईट वाटले.

धद्याव्यतिरिक्त जेव्हा जेव्हा त्याना अवसर मिळे तेव्हा ते भागवत वगैरे ग्रथ वाचीत, अगर आपल्या पित्याला वाचून दाखवीत. भागवतातील ससाराचे वर्णन, जडभरताचे आख्यान याचा नागमहाशयाचे मनावर विशेष परिणाम झाला. जडभरताचे आख्यान वाचता वाचता त्याच्या मनात येई की, साधारण हरिण पाडसाच्या मोहामुळे येवढा मुक्त पुरुष पुनर्जन्माच्या फेऱ्यात सापडला, तर साधारण जीवाची काय कथा ? ते मायेच्या अनिर्वचनीय व अचितनीय शक्ती सबधाने नेहमी विचार करीत, व विव्हल अतःकरणाने " आई आई " करीत याप्रमाणे त्याची मनाची तळमळ कमी न होता वाढत चालली " कोणत्या उपायाने महामायेच्या जालातून मुक्तता होईल ? कोणत्या उपायाने हा ससारार्णव पार होता येईल ? " हेच त्याचे अहर्निश विचार चालत "विवाह केला आहे , द्रव्योपार्जन चालू आहे, बधनावर बधने वाढत आहेत, मुक्तीचा उपाय तर दिसत नाही, ज्यावेळेस वैद्यकी सुरू केली त्यावेळेस दुःखितावर उपकार होतील, म्हणून रोग्याची आनदाने सेवा केली, दानास योग्य त्यास दान दिले, भुकेल्याला स्वमुखातील अन्न दिले, परतु खरे पाहिले असता किती जणाना सुख झाले ? कोणालाच नाही. मग या दुःखपूर्ण ससारात का पडलो ? विवाह का केला ? केवळ कनक काता याना घेऊन जन्म घालवावयाचा की काय ? छे! छे! ईश्वराचा साक्षात्कार करून, नरजन्माचे सार्थक करीन पण कोणाच्या आश्रयाने राहिले असता ईश्वर दर्शन होईल ? कोण महात्मा भेटेल ? कोणत्या मार्गाने चालावे ?" वगैरे विचाराचे वादळ त्याना उद्विग्न करून सोडी

या समयी सुरेश व इतर ब्राह्मभक्त मिळून गगातटाकी ईश्वरोपासना करीत. नागमहाशय देखील एका बाजूला बसून ध्यान करीत. ब्राह्मभक्ताची उपासना झाल्यावर कधी कधी कीर्तन व भजन होई, कीर्तन समयी नागमहाशय नृत्य करीत. भावावेशात नृत्य चालू असता कधी कधी ते पडत, व त्याच्या सर्व अगाला दुखापती होत किवा ते गगेत पडत ! अशा वेळी सुरेश बाबू त्याची काळजी घेत असे. त्याचा महाभाव सर्व दिवस रहात नसे. भावदमनाच्या बाबतींत नागमहाशय विशेष दक्ष रहात.

ते म्हणत " जितके राहील गुप्त तितके होईल पोक्त, व जितके होईल व्यक्त तितके समजावे त्यक्त " भावोन्मत्ततेच्या वेळी ईश्वरानुरागाची सर्व लक्षणे नागमहाशयाचे शरीरावर स्पष्ट दिसून येत. "कितीही प्रबळ विश्वास व अनुराग ईश्वराच्या ठिकाणी राहो, विधिपूर्वक दीक्षा घेऊन साधन, भजन केल्याशिवाय ईश्वरदर्शन होत नाही," असे एका साधूच्या मुखाने नागमहाशयानी ऐकिले. ते ऐकिल्याबरोबर त्याच्या मनाची तळमळ सुरू झाली. "कोण गुरू सापडेल ? कोण मला मत्र देईल ?" हेच विचार सुरू झाले. गगातटाकी कधी कधी अनेक साधू जमत, तेव्हा त्यातील एकादा आपल्यावर कृपा करील म्हणून रात्रीपर्यत ते तेथे बसून रहात. याप्रमाणे काही काळ लोटल्यावर, एक दिवस नागमहाशय कुमारटुली घाटावर स्नान करण्यास गेले, तो त्याच्या नजरेस पडले की, एकच उतारू घेऊन एक नाव किनाऱ्याकडे येत आहे. त्याचे लक्ष त्या नावेकडे लागले नाव घाटाला लागल्यावर त्यानी पाहिले तो, नौकेत आपलेच कुलगुरु कामार खारा येथील बगचद्र भट्टाचार्य आहेत. ताबडतोब त्यानी स्नान करून नौके-जवळ जाऊन गुरुचरणाच्या धुळीचे वदन केले, व कलकत्त्यास येण्याच्या कारणाची विचारपूस केली बगचद्र म्हणाले, " महामायेच्या आज्ञेने तुला दीक्षा देण्याकरिता आलो आहे !" नागमहाशयास हे ऐकून वाटले की आपली प्रार्थना जगदबेने ऐकली. त्याचे रहाणे त्यावेळी काशीमित्राच्या गल्लीत असे. बगचद्राला तेथे ते मोठ्या आनदाने घेऊन गेले. कुलगुरूला पाहिल्यावर, दीनदयाळ यासही परमानद झाला, कारण त्याची इच्छा नागमहाशयानी बगचद्राचाच दीक्षामत्र घ्यावा अशी होती. शुभमुहूर्तावर दुसऱ्या दिवशी, नागमहाशय व त्याची पत्नी या दोघानी शक्ती-मत्राची दीक्षा घेतली. नागमहाशयास दीक्षा दिल्यानतर ३–४ दिवसानी बगचद्र गावी रवाना झाले. त्याची नाव कुमारटुली घाटावर होतीच. काहीं दिवस रहाण्याबद्दल त्याना दोघानींही बराच आग्रह केला. पण ते राहिले नाहींत. नागमहाशयाना दीक्षा दिल्यानतर बगचद्र लवकरच मरण पावले. बगचद्र हे कौलसन्यासी होते, असे नागमहाशयाच्या पत्नीकडून कळले. दीक्षा ग्रहण केल्यानतर नागमहाशय रात्रदिवस साधनात निमग्न रहात. जपात

रात्र केव्हा जाई कळत नसे. अमावास्येच्या दिवशी उपवास करून गगा-तटाकी जप करीत असत. जप करता करता कधी कधी त्याचे देहभान नाहीसे होत असे. एक दिवस देहभान विसरून जप चालू असता, गगेला भरती येऊन त्यात त्याचा निश्चल देह वाहून गेला! देहज्ञान झाल्यावर ते पोहत काठाला येऊन पोहोचले चंद्राच्या ऱ्हासवृद्धीबरोबर अन्न कमी अधिक करण्याचा क्रम त्यानी काही दिवस ठेवला,व काही दिवस नक्तव्रत केले. तत्राच्या मताप्रमाणे ते साधने करीत, पण त्यानी कधी बिल्व फूल वगैरे घेऊन बाह्यपूजा केली नाही दीक्षाग्रहणानतर जप, तप, ध्यान, ह्यातच ते निमग्न रहात. परतु त्याचा स्वाभाविक कल रागमार्गाकडे (प्रेमा-भक्तीकडे) होता याचवेळी त्यानी जगदबेवर काही पद्ये रचली होती, व जप ध्यान झाल्यावर कधी कधी ते एकादे पद म्हणत चरित्राचे शेवटी त्यानी रचलेली काही पद्ये दिली आहेत.

याच्या या आचरणाने अर्थातच व्यवसायहानी होत चालली. लोक बोलावण्यास घरी येत, तो हे सापडत नसत, अर्थातच ते इतर वैद्याकडे जात, म्हणून उत्पन्नही कमी होत चालले.

दीनदयाळला वाटले, आता सर्वनाशाची वेळ येऊन ठेपली. सुरेश बरोबर नागमहाशयाची मैत्री जमलेली पाहून दीनदयाळ यास बरे वाटले. भगवतीच्या मृत्यूनतर नागमहाशयाच्या ठिकाणी जेव्हा वैराग्य बाणू लागले तेव्हा सुरेशच्या सगतीनेच हा सुधारला, असे दीनदयाळला वाटले. सुरेश धार्मिक व सदाचारी असल्याने, त्याच्या सगतीने नागमहाशयाचे धार्मिक ध्येय ज्यास्त प्रज्वलीत होईल, हे मात्र त्याच्या लक्षात आले नाही. लोका-जवळ दीनदयाळ मोठ्या गर्वाने—"सुरेशाच्या सगतीने आपल्या पुत्राचे कल्याण होईल," असे सागत असे. पण आता सुरेशाच्या सगतीने आपल्या आशा सफल होणे शक्य नाही, असे त्यास दिसून आले, म्हणून दीनदयाळने जेणेकरून नागमहाशयाचे मन ससारात लागेल असे करण्याचा त्याच्या पत्नीस उपदेश केला, पण काय उपयोग? पत्नी काय करणार? पतीची अवस्था तिने पूर्ण जाणली होती. घरी अन्नवस्त्राची वाण नव्हती हे खरे, कारण पितापुत्राच्या द्रव्योपार्जनाने ससार जेम तेम ठीक

चालला होता परतु निव्वळ अन्नवस्त्राने अत.करणाला खरे सुख लागत नाही. पत्नीला पतीचे प्रेम हेच जीवनसर्वस्व असते

वृद्ध पित्याला कष्ट होऊ नयेत म्हणून नागमहाशय स्वतः बाजारहाट करीत परतु त्याचे सर्व व्यवहार केवळ यत्रासारखे असत त्याचे मन सदोदित ईश्वर चितनात निमग्न राही खाणे पिणे केवळ केलेच पाहिजे म्हणून करीत. वैद्यक व्यवसाय तर, केवळ पित्याच्या आग्रहामुळे करीत दीनदयाळने नागमहाशयाच्या पत्नीस केलेला उपदेश ती नम्रपणे ऐकत असे. परतु तिच्या मनात येई की, कोणतीही स्त्री अशा गृहवासी सन्याशाला मायिक व्यवहारपाशात बद्ध करू शकणार नाही. मायिक प्रेम जरी नागमहाशय आपल्या पत्नीवर करू शकले नाहीत, तरी तिच्या कल्याणाची ते सदोदित काळजी घेत. पत्नीला ते म्हणत, " कायिक व मायिक हे काही खरे शाश्वत नव्हे. ज्याने आपले तनमनधन ईश्वरचरणी वाहिले, तोच नर धन्य व त्याच मार्गाचे तू अनुसरण कर. जो या मायिक प्रपचाला बळी पडला, त्याची त्यातून जन्मजन्मातरीही सुटका होणे अशक्य आहे. त्याचे ससार भ्रमण सुटत नाही म्हणून या हाडामासाच्या सापळ्यावर अनुरक्त न होता, मला विसरून जाऊन, जगन्मातेला शरण जा, म्हणजे तू इहपरलोकी सुख पावशील ! " झाले! तपस्व्याची स्त्रीही तपस्विनी बनली ! नागमहाशयाची पत्नी कलकत्त्यास आली, तेव्हा सुरेशचे येणे जाणे नेहमी चालूच असे. कधी कधी त्याचे जेवणही तेथेच होई. सुरेश म्हणतो, "पत्नीच्या आगमनाने नागमहाशयाच्या धर्मभावात कोणताच बदल झाला नाही." साहजिकच आहे. देवता ती देवताच, कितीही प्रतिकूल स्थिति प्राप्त झाली, तरी तिच्यात थोडाच बदल होणार आहे ? त्याची पत्नी आली म्हणून, त्याना विशेष कष्ट कधीच वाटले नाहीत.

नागमहाशय दिवसेंदिवस उग्र साधन भजनात निमग्न राहू लागले. दीनदयाळची प्रकृतीही दिवसेदिवस खालावत चालली ह्मातारपणी दीनदयाळ पालबाबूचे घरी खाजगी काम करू लागले, व ते देशी गेल्यास त्याच्याबद्दल नागमहाशय काम पहात. असे काही दिवस गेले. दीनदयाळच्याने वृद्धपणामुळे काम होईना. नागमहाशयाची इच्छा ही की,

त्यानी आता देशात राहून स्वस्थपणे हरीभक्ती करीत असावे, किंवा येथेच राहून नोकरीचा व्याप सोडून, ईशभजनात कालक्रमणा करावी. सेवेकरिता आपली पत्नी आहेच परतु पुन्हा वाटे, येथे राहिल्याने त्याच्याने एकाग्र मनाने ईशचितन होणार नाही. त्याच्याकडे नाना तऱ्हेचे लोक येत, तेव्हा सर्व विषयकथा चालत व दीनदयाळही त्यात भाग घेत असत. दीनदयाळ सकाळी दुर्गानाम लिहीत असत, व ते करिताना देखील, आलेल्या लोकाबरोबर त्याचा नाना प्रकारच्या विषयाचा उहापोह चाले. हे पाहून नागमहाशयास फार वाईट वाटे, व ते पित्याला म्हणत " अजूनही तुमच्याने विषयाचे चितन सोडवत नाही ? ईश्वराचे नाव लिहिता लिहिता सुद्धा विषयकथा चालतात यास काय म्हणावे ? " याप्रमाणे पितापुत्राचे नेहमी सभाषण चाले अखेरीस त्याच्या कार्याचा भार आपल्या शिरावर घेऊन, पित्याला देशी पाठवावयाचे ठरवून, त्यानी दीनदयाळला देशी रवाना केले, व पत्नीसही त्याच्या सेवेकरिता तेथे पाठवून दिले. दीनदयाळ व पत्नी याना घरी पाठवून दिल्यावर, नागमहाशय कुमारटुलीतील घरी राहू लागले नेहमीप्रमाणे त्याच्याकडे सुरेश नित्य येई, व दोघेही बसून निर्विघ्नपणे ईश्वरचर्चा करीत. परतु नागमहाशयाची नुसती चर्चेने तृप्ती होईना ते म्हणू लागले "चर्चा करिता करिता आयुष्य जात चालले. प्रत्यक्ष साक्षात्कार जर करून घेतला नाही, तर आयुष्य व्यर्थ होय." सुरेश बाबूनी केशव बाबूच्या समाजात ऐकिले होते की दक्षिणेश्वर येथे एक कामकाचनत्यागी, ईश्वराशी सदा तन्मय असणारे, साधू आहेत, व त्याचा वारवार भावसमाधीही लागतो. सुरेशने नागमहाशयास तेथे घेऊन जाण्याचे ठरविले, परतु त्याने काही करणाने नागमहाशयास मात्र तसे कळविले नाही. दोन महिन्यानी सुरेश एक दिवस त्याना म्हणाला, " दक्षिणेश्वर येथे एक उत्तम सत्पुरुष आहेत, त्याच्या दर्शनास येता काय ? नागमहाशय म्हणाले, " चल आजच जाऊ. " त्याप्रमाणे जेवण खाण करून दोघेही घराबाहेर पडले. दक्षिणेश्वर कलकत्त्याच्या उत्तरेस आहे, असे ऐकिल्यावरून ते त्या दिशेने चालू लागले. तो चैत्रमास असल्यामुळे, जिकडे तिकडे वणवा पेटल्याप्रमाणे उष्ण ज्वाळा चालल्या

होत्या, त्याची पर्वा न करिता दोघेही उन्मत्तपणें चालले होते, जणू काय एखादी अदृश्य शक्तीच त्याना आपल्याकडे आकर्षित होती. दक्षिणेश्वर किती लाब आहे हे त्याना माहीत नव्हते दोघेही एकाग्र मनाने उत्तरेकडे चालले होते. बरेच लाब गेल्यावर त्यानी एका प्रवाशाला रस्ता विचारला, तेव्हा त्याना आढळून आले की, आपण दक्षिणेश्वरचा रस्ता सोडून भलतीकडेच आलो तेव्हा तो रस्ता सोडून,प्रवाशाने दाखविलेल्या मार्गाने ते चालू लागले, व दुपारी सरासरी २ च्या सुमारास राणी रासमणीच्या दक्षिणेश्वर येथील काली मदिरात येऊन पोहोचले. ते स्थान अति सुदर होते. जणू देवभूमीच. ससाराचा कोलाहल नाही! सर्व स्थान मधुर सुवासाने भरून गेले होते ! किती आल्हादकारक वायूच्या लहरी ! किती सुदर ते सरोवर ! तसेच देव मदिराची किती उच्च शिखरे ! तेथील नवपल्लवित वृक्ष जणू काय आपल्या आदोलनाने ससारतप्त जीवाना " हेंच शातिस्थान आहे," असे म्हणून हाकाच मारीत आहे की काय असे भासत होते !

उद्यान पहात पहात दोघेहीजण श्रीरामकृष्ण ज्या बाजूला रहात, त्याच्या पूर्वेकडील दरवाज्याजवळ येऊन पोहोचले. दरवाज्याजवळ एक जटाधारी व्यक्ति बसली होती. नागमहाशयानी सदहू व्यक्तीस विचारले "येथे एक ब्रम्हचारी रहातात ते कोठे आहेत?" जटाधारी गृहस्थ म्हणाला " हा, येथे एक ब्रम्हचारी साधू रहातात खरे ते आज चदननगरास गेले आहेत तुम्हीं आणखी कधी तरी या. "

एवढे कष्ट करून ते तेथे गेलेले! वरील उत्तर त्याच्या कानी पडतांच दोघेही हताश झाले, व आता काय करावे याचा ते विचार करू लागले. शिष्टाचाराप्रमाणे जटाधारी गृहस्थाशीं दोन शब्द बोलून, ते जाण्याच्या विचारात होते, तोच नागमहाशय याच्या नजरेस पडले की, आतून कोणीतरी आपल्याला खुणेने बोलावीत आहे. तेच श्रीरामकृष्ण होत, असे त्याना स्वयस्फूर्तीने वाटताच, जटाधारी गृहस्थाची गोष्ट न मानता ते दोघेही घरात शिरले.

जटाधारी गृहस्थाचे नाव प्रतापचद्र हाजरा होते.नागमहाशय म्हणत,"ईश्व-

राची माया किती विलक्षण आहे पहा! बारा वर्षे हाजरा महाशय श्रीरामकृष्णाजवळ राहून त्याना ते कोण हे मात्र कळले नाही! ईश्वराने कृपा केल्याशिवाय, त्याचे ज्ञान होणे शक्य नाही." श्रीरामकृष्णाच्या जीवन चरित्रातील एक गोष्ट वर दिलेल्या सिद्धाताचे उदाहरण म्हणून, स्वामी सुबोधानद खालील गोष्ट सागत. "श्रीरामकृष्ण आपला भाचा हृदय, याबरोबर एक दिवस कालीघाटावर गेले. काली मदिराच्या पूर्वेस जे सरोवर आहे, त्या ठिकाणीं पूर्वीं दाट झाडी होती. श्रीरामकृष्ण याना त्या बाजूला दिसले की,जगदबा लाल काठाचे वस्त्र नेसून,कुमारी वेशाने इतर कुमारिकाबरोबर नाना तऱ्हेचे खेळ खेळत आहे हे पाहून श्रीरामकृष्ण "आई आई!" म्हणत म्हणत समाधीमग्न झाले! त्याची समाधी उतरल्यानतर परत येऊन मदिरात पहातात तो, त्याच प्रकारचा पोषाक आज श्री जगदबेच्या मूर्तीवर आहे असे त्याना दिसले. वरील हकीगत हृदय यास कळताच हृदय म्हणाला, "मामा, तुम्ही मला तेव्हा सागितले असते तर मी धावत जाऊन जगदबेला धरून ठविले असते." हे ऐकून श्रीरामकृष्ण हासून म्हणाले "अरे ते काय शक्य आहे? जगदबेने धरू दिल्याशिवाय तिला धरणे कोणाला शक्य आहे? तिची कृपा झाल्याशिवाय कोणालाही तिचे दर्शन होणे शक्य नाहीं."

पहिल्या दिवशींच नागमहाशयाच्या मनात हाजराविषयी तिरस्कार उत्पन्न झाला. ते म्हणत—"श्रीरामकृष्णाच्या जवळ राहून देखील त्याच्या अगीं सत्यानुराग बाणला नाही. खोटे बोलून आम्हाला त्या दिवशीं त्याला परत लावावयाचे होते, पण दयामय श्रीरामकृष्णानी आपल्या चरण कमली आम्हाला स्थान दिले."

---

# प्रकरण चौथें.



## श्रीरामकृष्ण–दर्शन.

नागमहाशय व सुरेश या दोघानी घरात प्रवेश केला, ता त्याच्या नजरेस असे पडले की, श्रीरामकृष्ण सहास्य वदनाने एका लहान बाजेवर खाली पाय सोडून बसले आहेत. सुरेश हात जोडून नमस्कार करून जमिनीवरील चटईवर बसला नागमहाशयानी साष्टाग नमस्कार केला, पण ते पदधूली घेऊ लागताच श्रीरामकृष्णानी पाय वर जुळून घेतले, व स्पर्श करू दिला नाही " आपण अजून सत्पुरुषाच्या चरण-स्पर्शास योग्य नाही," असे वाटून नागमहाशय एका बाजूला बसले

श्रीरामकृष्णानी दोघानाही कुशल प्रश्न विचारले. नाव, गाव, व्यवसाय, कोण कोण नातेवाईक आहेत, लग्न झाले की नाही वगैरे सर्व माहिती विचारली नतर कथानुरोधाने म्हणाले कीं " ससारात पॉकाल मत्स्याप्रमाणे रहावे ससारात रहाण्यात दोष कोणताच नाहीं. पॉकाल मत्स्य चिखलात रहातो, पण अगाला चिखल लागू देत नाही. त्याप्रमाणे ससारात रहावे, पण त्यातील आसक्ति रूपी मळ मनाला लागू देऊ नये." नागमहाशय एकाग्रतेने श्रीरामकृष्णाच्या मुखाकडे पहात होते, ते पाहून रामकृष्ण म्हणाले " असा काय पहातोस ? "

नागमहाशय म्हणाले, " आपल्याला पहावयास आलो, म्हणून आपल्याकडे पहातो," आणखी काही वेळ बोलणे झाल्यावर, श्रीरामकृष्ण म्हणाले " तिकडे पचवटीकडे जाऊन थोडे ध्यान कर जा."

अर्धा तास ध्यान केल्यावर सुरेश व नागमहाशय श्रीरामकृष्णाकडे परत आले, व नतर श्रीरामकृष्णानी स्वतः त्याच्या बरोबर जाऊन त्याना सर्व देऊळ दाखविले. श्रीरामकृष्ण पुढे होते, नागमहाशय व सुरेश त्याच्या मागोमाग चालू लागले. श्रीरामकृष्णाच्या खोलीजवळ असलेल्या द्वादश शिव मंदि-

रातलि प्रत्येक मदिरात जाऊन ज्याप्रमाणे शिवलिंगाला त्यानी नमस्कार व प्रदक्षिणा केल्या, त्याप्रमाणे नागमहाशयही करू लागले. सुरेश पडला ब्राह्म. तो सगुण देवता मानत नसल्यामुळे सर्व व्यवहार स्तब्धपणे पहात राहिला. नतर विष्णु मदिरातही वरप्रमाणे नमस्कार करून श्रीराम-कृष्ण भवतारिणी श्री जगदबा इच्या देवळाकडे वळले. श्रीभवतारि-णीच्या मदिरात प्रवेश करिताच श्रीरामकृष्णाचे झालेले भावातर पाहून दोघेही चकित झाले.

बालक ज्याप्रमाणे आईचा पदर धरून तिच्या भोवती प्रेमाने फिरू लागते, त्याप्रमाणे श्रीरामकृष्ण श्रीभवतारिणीला प्रदक्षिणा करू लागले. नतर श्रीमहादेव व श्रीजगदबा याचे चरणी मस्तक ठेऊन श्रीरामकृष्ण आपल्या घराकडे वळले.

सुमारे ५ वाजता नागमहाशय व सुरेश यानी जाण्याची परवानगी मागितली. श्रीरामकृष्ण म्हणाले "येत जा, असेच वरचेवर आल्यागेल्या-नेच परिचय होतो."

घरीं परत जात असता नागमहाशयाचा केवळ एक विचार चालला होता. "श्रीरामकृष्ण कोण? साधू, कीं सिद्ध महापुरुष, का आणखी कोणी!" वरील दिवसाचे भावभक्तीपूर्ण चित्र त्याच्या हृदयात पक्के ठसले. विस्तवात आहुति टाकली म्हणजे अग्नि ज्यास्त पेट घेतो, त्याप्रमाणे ईश्वरलाभाची तळमळ नागमहाशयाच्या अतःकरणात पेटू लागली. आहार निद्रा, लोकाशीं सभाषण वगैरे सर्व बद झाले. सुरेशबरोबर त्याच्या श्रीराम-कृष्णाच्या गोष्टी सुरू झाल्या.

एक आठवड्यानतर पुन्हा दोघेजण श्रीरामकृष्णाकडे आले. नागमहाश-यांची उन्मादावस्था पाहिल्याबरोबर श्रीरामकृष्णाचा भावावेश वाढत चालला व ते म्हणाले "आलास! ठीक झाले. तुझ्याकरिताच तर मी किती दिवसापासून येथे बसून आहे." नंतर नागमहाशयास जवळ बसवून म्हणाले "भिऊ नको, तुझी तर खूप उच्चावस्था आहे." नतर त्यानीं सुरेश व नागमहाशय यास पचवटीत जाऊन ध्यान करण्यास सागितलें. काहीं वेळाने श्रीरामकृष्णानी तेथे जाऊन हुक्का भरून आण-

ण्यास नागमहाशयास सांगितले. नागमहाशय हुक्का भरून आणण्याकरिता गेले असता श्रीरामकृष्ण सुरेशला म्हणाले " पाहिलेस ? याची अवस्था धडाडून पेटलेल्या अग्नीप्रमाणे आहे." असे म्हणतात तोंच नागमहाश यानी हुक्का तयार करून आणिला. पुन्हा नागमहाशयास श्रीरामकृष्ण म्हणाले " जा बरे, माझे तेवढे उपरणे व बटवा आण पाहू. येताना पाणी भरून एक लोटाही घेऊन ये." श्रीरामकृष्णाची सेवा करण्याचा योग आलेला पाहून, त्याना कल्पनातीत आनद झाला, पण श्रीरामकृष्णानीं पदधूली घेऊ दिली नाहीं, एवढेच शल्य त्याच्या मनाला टोंचीत होते.

सुरेशला काही काम असल्यामुळे नागमहाशय एकटेच एक दिवस श्रीरामकृष्णाकडे आले त्या दिवशी देखील श्रीरामकृष्णाना भावावेश झाला नागमहाशयास पहाताच ते काही बडबड करीत उठले. त्यांची ती अवस्था पाहून नागमहाशयाना भय वाटले श्रीरामकृष्ण त्यास म्हणाले " तू वैद्य आहेस, माझ्या पायाला काय झाले आहे पहा बरे !" देहभानावर असल्यासारखे त्याचे हे शब्द ऐकून, नागमहाशयाचे भय नष्ट झाले, आणि त्याचा पाय हातावर घेऊन नीट तपासीत ते म्हणाले ' काही तर दिसत नाहीं." श्रीरामकृष्ण म्हणाले " नीट पहाना काय झाले ते. " नागमहाशयास बोचत असलेले शल्य आज नाहीसे झाले ! चरणस्पर्शाचा अधिकार आज प्राप्त झाला म्हणून आपणास धन्य मानून, त्याचे चरण आपल्या हृदयावर व शिरावर धारण करून, त्यानी अश्रूनी भिजवून टाकले. नागमहाशय म्हणत—" मला काही त्याच्याजवळ मागावयाचें नव्हते. माझी इच्छा जी होती ती त्यानीं जाणून पूर्ण केली. भगवान् श्रीरामकृष्ण कल्पतरु. ज्याची जी इच्छा असे, ती ते तेव्हाच पूर्ण करीत." ( अर्थात् धन, मान, कीर्ति, याची नव्हे तर फक्त हरीभक्तीसबधाची.)

नागमहाशय याची दृढ धारणा झाली कीं, श्रीरामकृष्ण साक्षात् नारायण आहेत. ते म्हणत कीं, "त्याच्याकडे वारवार गेल्यावर मला कळले कीं श्रीरामकृष्ण साक्षात् नारायण असून, गुप्तरूपाने दक्षिणेश्वरीं बसून लीला करीत आहेत." तुह्माला हें कसे कळलें, म्हणून कोणी पृच्छा करताच ते म्हणत " त्यानींच कृपा करून मला समजावून दिलें.

त्याच्या कृपेशिवाय नुसत्या हजारो वर्षाच्या तपश्चर्येने काय होणार ? ईश्वरकृपेशिवाय सर्व व्यर्थ. ''

काही दिवसानतर श्रीरामकृष्णानी स्वतःच्या शरीराकडे बोट करून म्हटले ' याच्या बाबतीत तुझे काय मत आहे ? '' नागमहाशय हात जोडून नम्रपणे म्हणाले '' प्रभो ! मला सागण्याचे काहीच प्रयोजन उरले नाही, कारण आपल्या कृपेनेच आपण कोण हे मला ज्ञात झाले. आपण साक्षात् नारायण !'' हे ऐकताच श्रीरामकृष्णाचा समाधी लागला. व त्या स्थितीत त्यानी आपला उजवा पाय नागमहाशयाच्या हृदयावर ठेवला. त्याबरोबर त्याचे भावातर झाले, व सर्व स्थावर जगम वस्तूत एक प्रकारचे दिव्य तेज जणू उचबळून राहिले आहे, असे त्याना दिसले. नागमहाशय म्हणत '' श्रीरामकृष्णाच्या जन्मापासून धर्माचा प्रचड प्रवाह सुरू झाला आहे, त्यात सर्व मलिनता धुवून जाणार. श्रीरामकृष्ण पूर्ण ब्रह्म नारायण. सर्व भावाचा असा समन्वय आजपर्यंत कोणत्याच अवतारात झाला नाही.''

एक दिवस श्रीरामकृष्ण आहारानतर विश्राम करीत असता नागमहाशय तेथे जाऊन पोहोचले ज्येष्ठ मास असल्यामुळे भारी उष्मा होत होता श्रीरामकृष्ण नागमहाशयाच्या हातात पखा देऊन निजले काही वेळ वारा घातल्यानतर, नागमहाशयाचा हात अतिशय जड झाला, परतु श्रीरामकृष्णाची आज्ञा होईपर्यंत त्यानी वारा घालणे तसेच चालू ठेविले. शेवटी हात इतका जड झाला की, हात हालेना, तेव्हा श्रीरामकृष्णानी त्याचा हात धरून वारा घालणे थाबविले. नागमहाशय म्हणत ''श्रीरामकृष्णाची निद्रा म्हणजे सामान्य जीवाची निद्रा नव्हे. ते सदा जागृत असत. ही स्थिति फक्त ईश्वराचीच असू शकते. साधु किवा सिद्ध पुरुष याना ती साध्यातीत आहे.''

नागमहाशय बसले असता एक दिवस '' चिदानदरुपः शिवोह शिवोह '' म्हणत म्हणत स्वामी विवेकानद तेथे येऊन पोहोचले नागमहाशयाकडे बोट करून श्रीरामकृष्ण म्हणाले '' ह्याचा ठीक ठीक दीनूभाव आहे. याला ईश्वराव्यतिरिक्त कसलेच भान नाही. '' स्वामी

विवेकानद म्हणाले “ह. आपण म्हणता तेव्हा असेलच ह्याची अशी स्थिति.” नागमहाशयाच्या व विवेकानदाच्या ईश्वरसबधीं कथा सुरू झाल्या बोलता बोलता नागमहाशय म्हणाले “ईश्वर इच्छामय, सर्व काहीं त्याच्या इच्छेने चालते, पण मनुष्य अहकाराने ‘हे मी केले’ वगैरे म्हणत असतो”

**स्वामी विवेकानद म्हणाले**—मी ‘तो आणि इच्छामय” वगैरे काही जाणत नाही मीच प्रत्यक्ष ईश्वर माझ्या मध्येच सर्व ब्रह्माडाची उत्पत्ति स्थिति, लय वगैरे घडामोड चालू असते.

**नागमहाशय म्हणाले**—मनुष्य आपल्या इच्छेने एक केस देखील वाकडा अगर सरळ करू शकत नाही, मग ब्रह्माडाची गोष्ट दूरच राहिली ईश्वरी इच्छेव्यतिरिक्त झाडाचे पान देखील हालत नाही.

**स्वामी विवेकानंद म्हणालेः**—मी इच्छा केली नाही, तर चद्र सूर्याच्या गतीचाही रोध होईल केवळ माझ्याच इच्छेने या ब्रह्माडातील सर्व क्रिया यत्राप्रमाणे सुरळीत चालल्या आहेत.

श्रीरामकृष्ण जवळच एका लहान बाजेवर बसून वरील सवाद ऐकत होते. नतर हासत हासत म्हणाले “हे पहा, नरेंद्र हा नागव्या तरवारीसारखा आहे. त्याच्याच मुखी ही भाषा शोभते” हे एकताच नागमहाशयास वाटले की “विवेकानद मनुष्य नव्हेत, तर श्रीरामकृष्णाच्या लीला पूर्ण करण्याकरिता प्रत्यक्ष महादेवच अवतरलेला आहे,” म्हणून त्यानी त्यास नमस्कार केला व भाषण बद केले स्वामी विवेकानदाच्या सबधीचे त्याचे वरील प्रमाणे असलेले मत आजन्म बदलले नाही “आपल्याला काहीं सत्पुरुषाचे दर्शन वगैरे घडले की काय?” म्हणून एका सद्गृहस्थाने पृच्छा केली असता, नागमहाशय म्हणाले “साक्षात् मुक्तिदाता श्रीरामकृष्ण व त्याचे पट्टशिष्य, शिवाचे अवतार स्वामी विवेकानद याचे दर्शन मला घडले आहे”

श्रीरामकृष्ण जे काही बोलत, ते नागमहाशय वेदवाक्याप्रमाणे मानीत व म्हणत की “त्याच्या थट्टेच्या बोलण्यातही फार गूढ अर्थ असे, पण मी पडलो अडाणी माणूस, मला त्याची खरी ओळख पटली नाहीं.”

श्रीरामकृष्णाकडे बरेच दिवस येणे जाणे झाल्यावर एक दिवस श्रीरामकृष्ण एका भक्ताला, " हे बघ, वैद्य, वकील, मुखत्यार, दलाल वगैरे लोकाना धर्मलाभ होणे फार कठीण. " असे सागताना नागमहाशयानी ऐकिले. ते म्हणाले "वैद्याचे मनात सारा दिवस औषध, रोगी वगैरेची विवचना असल्यामुळे त्याना ईश्वराकडे मन लावणे फार दुर्घट आहे "

यापूर्वींच नागमहाशय यास ध्यानाच्या वेळीं सर्व रोग्याच्या मूर्ती डोळ्यापुढे दिसत, त्यामुळे त्याच्या ध्यानात व्यत्यय नेहमीच येत असे. श्रीरामकृष्णाचे वरील शब्द श्रवण करिताच " जो व्यवसाय ईश्वरलाभाच्या आड येतो, त्या व्यवसायाने द्रव्योपार्जन करणेच नको," म्हणून निश्चित करून, घरी आल्यावर औषधाची पेटी व इतर वैद्यकीय पुस्तके या सर्वांस त्यानी गगेत टाकून दिले, व गगास्नान करून परत घराची वाट धरली !

आता ठेकेदारीचे काम हेच त्याना उपजीविकेचे एकट साधन राहिले. त्या कार्यांत त्याना फार काम करावे लागत नसे, फक्त जेव्हा बागबाजार किवा खिदिरपूर येथे जलमार्गाने माल पाठवावा लागे, तेव्हाच विशेष श्रम करावे लागत. वैद्यकी सोडून जेव्हा त्याना जपतपाला मुबलक वेळ मिळू लागला, तेव्हा दक्षिणेश्वर येथे ते वरचेवर जाऊ लागले. घरी गगाजल ठेवण्यास एक मोठा राजण होता. त्याजवळ बसून ते ध्यान करीत. ज्या दिवशी त्याना माल घेऊन बागबाजार येथे जावे लागे त्या दिवशीं ते कलकत्त्याच्या पलीकडे एकादे सुदर ठिकाण पाहून त्या ठिकाणी ध्यान करीत बसत. एक दिवस, त्याना, ध्यान करीत असता एक अद्भुत दर्शन झाले, व घरीं आल्याबरोबर त्यानीं ते सुरेशला सागितले. त्यानतर त्याना ध्यानात पूर्वीप्रमाणे कधींच विशेष आनद वाटला नाही. श्रीरामकृष्णाचेकडे वारवार येण्याने त्याच्या ठिकाणी तीव्र वैराग्य बाणले. ससारत्याग करण्याचे मनाशी ठरवून, एक दिवस ते श्रीरामकृष्णाचेकडे आले. घरात पाऊल ठेवतात तोंच, श्रीरामकृष्णानीं भावावेशात " ससार आश्रमात काय दोष आहे?" हे उच्चारलेले शब्द त्याच्या कानावर पडले. श्रीरामकृष्ण पुढे म्हणाले " ईश्वराकडे सदा मन असले

म्हणजे झाले. गृहस्थाश्रम कसा आहे समजले ? जसे किल्ल्यात राहून युद्ध करणे सोईस्कर, त्याप्रमाणे प्रपंचात राहूनच मन ईश्वरार्पण करणे चांगले. तुझे पाहून पाहून इतर साधारण गृहस्थ गृहस्थाश्रम धर्माचे यथार्थ मर्म समजतील." नागमहाशय म्हणाले " काय ही विडंबना! ज्यांनी माझ्या मनात हा वैराग्याग्नि पेटविला, तेच म्हणतात की " जनकाप्रमाणे गृहस्थाश्रमातच रहा!" श्रीरामकृष्णाच्या मुखातून एकदा जे शब्द निघत, त्याच्या विरुद्ध जाण्याची कोणाचीच प्राज्ञा नव्हती. ज्याला जे योग्य, ते एक दोन गोष्टीतच ते सर्व समजावून देत. श्रीरामकृष्णाचा वरील उपदेश शिरसावंद्य समजून नागमहाशय घरी गेले, पण त्यांचे मन फार व्याकुल झाले मुखाने "हाय भगवान्! हाय भगवान्!" म्हणत, कधी मातीत लोळत पडत, व कधी कधी काट्यात पडून त्याचे सर्व अंग रक्तमय होई. घरी येण्यास कधी दुपार तर कधी कधी २ वाजून जात खाण्याची शुद्ध नाही! सुरेशने जबरदस्तीने खाऊ घातले, तर अन्नाशी गाठ. दिवस कसा जाई कळत नसे. त्याच्याने पालबाबूकडचे कामही होईनासे झाले. काही दिवसापूर्वी रणजित् हाजरा या नावाच्या एका दरिद्री पण अत्यंत धर्मभीरु गृहस्थाशी नागमहाशयाचा परिचय झाला होता. ज्या दिवशी नागमहाशयाना कामावर जाणे अशक्य होई, त्या दिवशी रणजित् हाजरा त्यांचे काम करून येई.

या सुमारास नागमहाशय एकदा आपल्या गावी गेले. त्यांचे ते तीव्र वैराग्य पाहून त्यांच्या पत्नीला फार चिंता वाटू लागली, व वाटले, गृहस्थाश्रमाची आपल्या पतीला बिलकूल आस्था नाहीं. नागमहाशयानीही तिला सांगितले की श्रीरामकृष्णचरणी अर्पण केलेल्या या देहाकडून, यापुढे संसारातील कोणतेही काम होणे शक्य नाही.

नागमहाशयाच्या घरामागे त्यांच्या भगिनीने एक भोपळ्याचा वेल लाविला होता, तो चांगला मोठा झाला होता. त्या झाडाजवळच एक दिवस एकाने एक गाय बांधली. दोर आखुड असल्यामुळे ती ते झाड खाण्याकरिता धडपड करी, पण तिचे तोंड पुरेना ती गाय भग्नमनोरथ झालेली पाहून, नागमहाशयानी "खा, आई खा" असे म्हणून तिचा दोर

सोडून टाकला. गाय आनदाने वेल खाऊ लागली दीनदयाळ, ते कृत्य अवलोकन करिताच निर्भत्संनापूर्वक म्हणाला " ससाराला मदत होईल असे करणे तर लाबच राहिले, उलट नुकसान मात्र होईल असे का करतोस ? स्वतः एक कवडी तर मिळवीत नाहीस, वैद्यकी सोडून बसलास, आता काय करून आपले पोट भरणार? कसे दिवस काढणार?"

**नागमहाशय म्हणाले**:—ईश्वराची इच्छा असेल तसे होईल, आपण काही ही काळजी करू नका.

**दीनदयाळ म्हणाला** —हा ते समजलो. आता तू दिगबर होऊन काय बेडक खाऊन रहाणार आहेस वाटते ?

नागमहाशयानी यावर काहीच उत्तर न देता नेसलेले वस्त्र फेडून टाकून आवारात पडलेला एक मृत बेडूक आणून, तोच ते खात बसले! व खाता खाता पित्याला म्हणाले—" मी या क्षणी आपल्या दोन्हीहि आज्ञा पालन केल्या आहेत माझ्या अन्नवस्त्राची आता आपण चिंता करू नका आपणास साष्टाग प्रणिपात करून सागतो की, तुम्ही मात्र या वृद्ध वयात ससार चिंता सोडून ईश्वराचे नामस्मरण करा." दीनदयाळला भय वाटले व त्याने पुत्राची उन्मादावस्था पाहून त्याच्या पत्नीस सागितले, "आजपासून याच्या मनाविरुद्ध काहीही होऊ देऊ नको"

नागमहाशय जोपर्यंत घरी रहात असत, तोपर्यंत दीनदयाळला ससार-चिंता करण्यास अवसरच देत नसत. सदा त्याना पुराण श्रवण करवीत. दीनदयाळजवळ जे लोक गप्पा सप्पा करावयास येत त्याची निर्भत्सना करून ते म्हणत "आपण येथे येऊन बाबाबरोबर ससार–कथा करू नका, नाहीतर येथे येणे बद करा"

नागमहाशय कलकत्त्यास आल्यावर सुरेशने दीनदयाळसबधी विचार-पूस करिताच ते म्हणाले, "ज्याला एकदा ससाररूप काळसर्प डसला त्यावर जगन्मातेची कृपा झाल्याशिवाय त्याचा निभाव लागणे कठीण" नतर "जय रामकृष्ण! जय रामकृष्ण! माझ्या बाबावर दया करा," म्हणून व्याकुल अतःकरणाने प्रार्थना करू लागले. पुढे पुन्हा म्हणाले "या वयात देखील पित्याला विषय–चिंता सोडीत नाही. त्याची ससारासक्ति, अजून उडाली

नाही. वृद्धपणामुळे ते थकून गेले आहेत. कुठे जाववत नाही. परंतु गावा-तील सद्गृहस्थ भेटीस आले की, त्याच्याबरोबर नाना तऱ्हेच्या संसार-गोष्टी बोलत बसतात "

गावाहून परत आल्यावर नागमहाशय श्रीरामकृष्णास एक दिवस म्हणाले–" मला अजून तर स्वतःबद्दलची काळजी वाटतेच ईश्वरावर सर्व भार टाकून मी अजून निश्चित झालो नाहीच. " श्रीरामकृष्णानीं स्वतःकडे बोट दाखवून–" येथे भक्ती ठेविली म्हणजे क्रमाक्रमाने सर्व होईल " असे म्हटले नागमहाशय म्हणत. " श्रीरामकृष्ण स्वतःच्या इच्छेनुरूप आपल्या भक्ताची अध्यात्मिक उन्नति करून देत भक्ताची स्वतःची इच्छा असून काहीच होत नसे. याप्रमाणे मानवी मनाची घडा-मोड करणे श्रीरामकृष्णानाच शक्य आहे हा अधिकार मानवी जीवाला खास नाही

नागमहाशय यांचे तीव्र वैराग्य पाहून श्रीरामकृष्ण म्हणाले " तू घरीच रहा, तुला कसेबसे अन्न वस्त्र मिळत जाईल "

**नागमहाशयः**—घरात कसे रहावे ? दुसऱ्याचे दुःख कष्ट पाहून स्वस्थ रहाणे कसे शक्य होईल ?

**श्रीरामकृष्णः**—मी तुला खरे खरे सांगतो, तू घरीच राहिल्यास तुला कसलाही दोष लागणार नाही. तुला पाहून लोक चकित होतील.

**नागमहाशयः**—काय करून गृहस्थाश्रमात दिवस घालवू ?

**श्रीरामकृष्णः**—तुला काहीही करण्याची गरज नाही. फक्त साधू-समागम कर

**नागमहाशयः**—साधू कसा ओळखू ? मी तर भाबडा माणूस !

**श्रीरामकृष्णः**—अरे, तुला साधू शोधण्याची काही गरज नाही. तू घरी राहिलास म्हणजे, योग्य ते सत्पुरुष तुझ्याच घरी येऊन तुला भेटतील.

त्याप्रमाणे दिवसामागे दिवस जाऊ लागले. संसार–बंधनात जोपर्यंत रहाणे भाग आहे, तोपर्यंत शांतीची आशा कसली ? असे त्यांना वाटू लागले, व त्यांनी मनाशी ठरविले की ठेकेदारीचे काम रणजितवर सोपवून निश्चित मने ईश्वरभक्ति करावी त्याप्रमाणे पालबाबूस हे कळविताच, ते म्हणाले

" मग आपले कसे चालणार ?" नागमहाशय म्हणाले, "रणजित दया करून जे काही देईल त्यात कसे तरी चालेल." पालबाबूनीं पाहिले की, नागमहाशयाकडून संसारकर्म होणे कठीण आहे, तेव्हा आपले आश्रित म्हणून त्याची काहीतरी अन्नपाण्याची सोय आपण केली पाहिजे, म्हणून त्यानी रणजितला बोलावून सांगितले की, तुला जी काही प्राप्ती होईल त्यातील अर्धा भाग तू नागमहाशय याना देत जा." याप्रमाणे त्यानी ठेक्याच्या कामाचा बंदोबस्त केला. रणजितला नागमहाशयाचा स्वभाव पूर्ण माहीत होता. त्याच्या हातात सर्व पैसे दिल्यास ते खर्च करून टाकतील, म्हणून तो आवश्यक लागणाऱ्या खर्चापुरते पैसे देऊन,बाकीचे दीनदयाळकडे पाठवून देत असे वरीलप्रमाणे नागमहाशयाची झालेली व्यवस्था ऐकून श्रीरामकृष्ण म्हणाले " ठीक झाले, उत्तम झाले "

यानतर नागमहाशय उग्र तपश्चर्येत निमग्न राहू लागले, व त्याचे श्रीरामकृष्णाकडे जाणे येणे वरचेवर होऊ लागले. श्रीरामकृष्णाकडे सुशिक्षित विद्वान् वगैरे सर्व प्रकारचे प्रतिष्ठित लोक, रविवारी अगर सुटीच्या दिवशी येत, आणि आपण मूर्ख, आपल्याला त्याचे भाषण कसे समजणार ? असे त्यास वाटे, म्हणून ते प्रथम प्रथम वरील दिवशी येत नसत. त्यामुळे त्याची व इतर श्रीरामकृष्णभक्ताची ओळख झाली नव्हती. आता ते नेहमी येऊ लागल्यामुळे, त्याची काही जणाशी ओळख होऊ लागली

एके रात्री गिरीश आपल्या दोन बाधवासह श्रीरामकृष्णाकडे आला, तेव्हा शरीर शुष्क, पण नेत्र नक्षत्रासारखे असलेला एक मनुष्य, अती दीन भावाने हात जोडून एका कोपऱ्यात बसलेला आहे, असे त्याला दिसले. श्रीरामकृष्णानी गिरीश व कोपऱ्यात बसलेले नागमहाशय या परस्पराची ओळख करून दिली. कोणत्या सुमुहूर्तावर त्याची परस्पर गाठ पडली कोणास ठाऊक, पण प्रथमपासूनच त्याची फार मैत्री जमली

नागमहाशय बहुधा दुपारीं गगातटाकीं फिरावयास जात. एक दिवस फिरता फिरता एक सौम्य मुद्रा असलेला तरुण मनुष्य तेथे फिरताना त्याच्या नजरेस पडला. नागमहाशयास वाटले कीं, हा श्रीरामकृष्णभक्त

असावा, व चवकशी करिता आपला अजमास खरा आहे असे त्याना आढळून आले. त्या तरुणाचे नाव ( हरीराज ) तुरियानद होते. तुरियानदाच्या कठोर ब्रह्मचर्य व्रतपालनाच्या गोष्टी ते सागत, आणि म्हणत “ असे असल्याशिवाय का तो श्रीरामकृष्णाच्या कृपेस पात्र झाला ?”

नागमहाशयानी या वेळेपासून जोडा व कपड या दोहोचाही त्याग केला. ते फक्त एक भागलपुरी बनात बाराही मास अगावर वागवीत आहाराचे बाबतीत “ ईश्वर इच्छेने जे मिळेल ते ग्रहण कर, तुला विधिनिषेधाचा दोष नाही,” असे श्रीरामकृष्णानी त्यास सागितले होते म्हणून त्यानी खाण्याच्या बाबतीत काहीच बधन ठेविल नव्हते. ज्यावेळेस जे मिळेल ते खात. त्याचा आहार अगदीच अल्प होता ते फक्त सध्याकाळी थोडेसे अन्न खात ते म्हणत “ देह आहे तोपर्यत थोडा तरी त्याला कर दिलाच पाहिजे.” जिव्हेला चागले खावे असे वाटेल म्हणून ते अन्नात मीठ किवा साखर कधीही घेत नसत नागमहाशय याचे अर्धे घर भाड्याने दिले होते. त्यात मेदिनीपूर येथील कीर्तीवास नावाचा गृहस्थ सहकुटुब रहात होता त्याचा तादुळाचा व्यापार असल्यामुळे त्याच्या घरी कधी कधी पुष्कळ तादुळाचा कोडा जमा होई एक दिवस नागमहाशयाच्या मनात आले की “ चागले वाईट याचा विचार करण्याचे कारण काय ? कोडा खाऊनच जीव जगवावा. काहीही खाऊन जीव रक्षण केला म्हणजे झाले ’ लगेच त्यानी मीठ किवा साखर काहीही न घालता, तो कोडाच नुसता पाण्यात भिजवून खाण्याची सुरुवात केली. एक दोन दिवसानंतर कीर्तीवासाच्या नजरेस वरील गोष्ट येताच, त्यानी तो सर्व कोडा विकून टाकला, व पुन्हा कधी कोडा घरी जमू दिला नाहीं. नागमहाशय म्हणत “ कोडा खाताना मला कधींही कष्ट झाले नाहींत, उलट शरीर मात्र हलके वाटत असे. दिवस रात्र खाण्याचा विचार करीत बसले तर मग ईश्वरभक्ति केव्हा करावयाची, व त्याचे नामस्मरण तरी केव्हा करावयाचे ? नित्य खाण्यापिण्याच्या आवडी निवडीचा विचार करीत गेल्याने थोडाच उद्धार होणार आहे ?” कीर्तीवास नागमहाशय यास एखाद्या सत्पुरुषाप्रमाणे मान देई. त्याच्या

घरी कोणी भिक्षा मागण्याकरिता आले, व नागमहाशयाजवळ त्यावेळी देण्यासारखे काही नसले, तर कीर्तिवास त्याना मदत करी

नागमहाशयाचे घर रस्त्यावर असल्यामुळे पुष्कळ भिकारी येत, परतु कोणीही कधी रिक्तहस्ते परत गेले नाहीत. एक दिवस एक वृद्ध वैष्णव त्याच्या घरी भिक्षा मागण्यास आला, पण घरात थोड्याशा तादुळाशिवाय काहीच नव्हते. नागमहाशयानी त्या वैष्णवाजवळ येऊन नम्रपणे म्हटले "महाराज, घरात थोडे तादूळ आहेत, दुसरे काहीच नाही. आपण तांदूळ घेता का ?" वृद्ध ब्राह्मण त्याचे श्रद्धायुक्त वर्तन पाहून, परम प्रीतीने तेच घेऊन चालता झाला. सुरेशाचा व त्याचा ३०–३५ वर्षे सहवास होता पण त्याने त्याना कधी फराळ करिताना पाहिले नाही. फक्त देवाचा किंवा श्रीरामकृष्णाचा प्रसाद म्हणून कोणी मिठाई वगैरे दिल्यास तेवढी मात्र घेत.त्या व्यतिरिक्त काहीही मिष्ट पदार्थ खात नसत. कारण ते म्हणत "असे केल्याने जिव्हालोलुपता वाढेल" ते जरी स्वतः मिष्ट पदार्थ खात नसत, तरी दुसऱ्याला मात्र गोडगोड पदार्थ खाऊ घालण्याची, त्याना फार आवड असे. ससारविषयक गोष्टी ते कधीही बोलत नसत कोणी बोलू लागल्यास त्याला मोठ्या कुशलतेने त्यापासून परावृत्त करीत. त्यानी म्हणावे " जय-रामकृष्ण ! आज कोणत्या भलत्या गोष्टी निघाल्या ? ईश्वराचे नाव घ्या, जगदबेचे नामस्मरण करा ! "

कोणावर काहीं कारणामुळे ते रागावले किवा कोणाविषयी त्याच्या मनात अप्रीति उत्पन्न झाली, तर ते हातास येईल त्या वस्तूने स्वतःच्या शरीरावर आघात करून घेत ! त्यानी कधीही कोणाची निंदा केली नाही किवा कोणाविरुद्ध एक शब्दही उच्चारला नाही. एक दिवस कोणा एका सबधाने बोलणे निघाले असता, त्याच्या विरुद्ध काही शब्द त्याच्या मुखातून बाहेर पडले त्या क्षणीच त्यानी जवळ पडलेल्या एका दगडाने आपल्या शिरावर आघात करून घेतला ! त्यामुळे सर्व डोकें रक्तबबाळ झाले. ती जखम बरी होण्यास जवळ जवळ एक महिना लागला वरील जखमेच्या बाबतींत ते म्हणत, " बरे झाले, पाजीपणाला अशीच शिक्षा पाहिजे ! "

षड्रिपूचा पराजय करण्याकरिता ते लघन करीत. ४।४दिवस लागोपाठ पाण्याचा थेंबही तोंडात न घालता रहात! एकदा एका दीर्घ लघनानतर ते स्वयपाक करावयास बसले, तोच सुरेश आला त्याला पाहून त्याच्या मनात काही कुविचार आले. “ अजून अपवित्र विचार मनात येतात अ ? ” असे म्हणून त्यानी स्वयपाकाचे भाडे फोडून टाकले व स्वतःचा धिःकार करीत सुरेशला वारवार प्रणाम करू लागले ! त्या दिवशी त्यानी अन्न ग्रहण केले नाही, फक्त एक पैशाचे पोहे व बतासे खाऊन ते पडून राहिले डोके दुखण्याच्या व्याधीमुळे त्यानी स्नान करणे सोडून दिले. आपल्या आयुष्याच्या जवळ जवळ २० वर्षात त्यानीं स्नान केले नाही म्हणून त्याचे शरीर अगदी रुक्ष दिसे. त्यातच त्याच्या उग्र तपश्चर्येने त्याच्या अतःकरणाची नम्रता व अहकारराहित्य त्याच्या चर्येवर स्पष्टपणे प्रतिबिबित झालेले दिसून येई

नागमहाशयानीं अहकाराला असे ठेचून टाकले होते की,पुन्हा आपले डोके वर काढण्याची त्याची प्राज्ञाच नव्हती रस्त्याने चालताना देखील एकाद्याला मागे टाकून त्याच्यापुढे त्याच्याने जाववत नसे ! सामान्य मजुरालाही रस्ता देऊन ते त्याच्या मागे चालत,व कोणाच्या सावलीवरही ते पाय देत नसत कोणच्याही प्रकारच्या बिछाइतीवर ते कधीच बसले नाहीत. कोणी तबाखूची चिलीम भरून दिली तर ते घेत नसत, परतु स्वतः मात्र सर्वाना वरचेवर भरून देत. आपल्या मनाजोग्या एकाद्या गृहस्थाची गाठ पडल्यास त्याला वरचेवर चिलीम भरून देत व स्वतःही ओढीत आलेला गृहस्थ जाऊ लागताच, त्याला आग्रहाने पुन्हा बसवून चिलीम भरून देत. ते म्हणत “ मी अधम, क्षुद्र, पिशाच्च माझ्याच्याने दुसरे काय घडणार ? भल्या लोकाची काही सेवा घडली, तरच काही या जन्माचे सार्थक ”

नागमहाशय जरी रागमार्गाचे साधक होते, तरी वैधी भक्तीचीही आवश्यकता त्याना मान्य असे. ते ज्याप्रमाणे स्वतः उग्र साधन करीत त्याचप्रमाणे लोकासही उपदेश करीत, व याच बाबतीत त्याचा व सुरेशचा वादविवाद होई.

नागमहाशयाबरोबर सुरेश ८–९ दिवस दक्षिणेश्वर येथे गेला. नतर त्यास काही कार्यानिमित्त कोयेटा येथे जावे लागले. कोयेटा येथे जाण्या-पूर्वी श्रीरामकृष्णाच्याकडून दीक्षा व उपदेश घेण्याविषयी नागमहाश-यानीं सुरेशला फार आग्रह केला पण सुरेशचा मत्रावर विश्वास नसल्या-मुळे तो वाद करू लागला. शेवटी श्रीरामकृष्ण जसे म्हणतील तसे करा-वयाचे असे ठरले. दुसऱ्या दिवशी ते दोघे श्रीरामकृष्णाकडे आल्यानतर नागमहाशयानी सुरेशला दीक्षा देण्यासबधी गोष्ट काढली. श्रीरामकृष्ण म्हणाले " हा तर ठीक म्हणतो. दीक्षा घेऊन साधन करावे हे त्याचे म्हणणे तुला कबूल नाहीं काय ?" तेव्हा सुरेश म्हणाला " माझा मत्रावर मुळीच विश्वास नाहीं." नतर श्रीरामकृष्ण नागमहाशयास म्हणाले " तर मग सध्याच त्याला दीक्षा देण्याची जरूरी नाही. घेईल पुढे केव्हा तरी"

काही दिवस कोयेटा येथे राहिल्यावर सुरेशच्या मनात दीक्षा घेण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली, व कलकत्त्यास गेल्यावर श्रीरामकृष्णाजवळ दीक्षा घेण्याचे त्याने आपल्या मनाशी ठरविले, पण त्याची इच्छा शेव-टास गेली नाही. कारण तो कलकत्त्यास आला, तेव्हा श्रीरामकृष्णाची लीला समाप्त होण्याची वेळ आली होती. इतके दिवस नागमहाशयाचे म्हणणे आपण ऐकिले नाही, म्हणून त्याने स्वतःचा धिःकार केला. श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यावर सुरेशला फारच तळमळ लागली. रात्री गगातटाकी जाऊन पतितपावन गगेला तो आपले दुःख निवेदन करी. एक दिवस गगातटाकी धरणे धरून बसला असता, मध्यरात्री श्रीराम-कृष्णाना गगेतून येताना पाहून तो विस्मित झाला. श्रीरामकृष्णानी त्याच्या जवळ येऊन, त्याच्या कानात बीज मत्राचा उपदेश दिला. सुरेश त्याची पदधूली घेण्याकरिता सरसावताच श्रीमूर्ति गुप्त झाली ! असो.

दिवसामागे दिवस जाता जाता ४ वर्षे निघून गेली. श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन होण्याचा समय जवळ येत चालला. दक्षिणेश्वर येथील आन-दाचा बाजार आता मोडून गेला होता. कलकत्त्याच्या उत्तरेस काशीपूर येथे राणी कात्यायनीचे जावई गोपाल बाबू याच्या बागेत श्रीरामकृष्ण रुग्ण शय्येवर पडले होते. नागमहाशय आता समजून चुकले की, श्रीराम-

कृष्ण ब्रह्मलीन होण्याची वेळ जवळ आली. त्यानी आपले नेहमींचे जाणे येणे बद केले. त्याचे कारण-ते म्हणत "श्रीरामकृष्णाचे शरीर–क्लेश पहाणे लाबच राहो, पण त्याच्या नुसत्या स्मरणाने काळीज फाटून जाते." श्रीरामकृष्णानीं जेथे स्वेच्छेन आपल्या देहात व्याधीला स्थान दिले व त्याच्या दु खाचे परिमार्जन कोणत्याही मार्गान ज्या अर्थी आपण करू शकत नाही, त्या अर्थी त्याच्याकडे न जाणेच चागले असा विचार करून त्यानी वारवार जाण्याचे बद केले मात्र कधी कधी तेथ जाऊन फक्त दर्शन घेऊन परत येत श्रीरामकृष्णाच्या सर्वांगाचा दाह होत असे एक दिवस नागमहाशय श्रीरामकृष्णाकडे गेले असता ते म्हणाले " अरे जरा अलीकडे ये व मला बिलगून बैस तुझे थड शरीर माझ्या अगाला लाग-ल्यान माझा दाह जरा शात होईल " असे म्हणून श्रीरामकृष्ण बराच वेळ नागमहाशयास आलिंगन देऊन बसले

सुरेश कोयटा येथून आल्यावर श्रीरामकृष्णाच्या भेटीस गेला असता श्रीरामकृष्ण एक दिवस त्याला म्हणाले, "अरे तो डॉक्टर कोठे आहे? त्याला वैद्यकीचे चागले ज्ञान आहे त्याला एकदा ये म्हणून साग बरे " सुरेशने त्याप्रमाणे नागमहाशयास सागितले. नागमहाशय त्याच्याकडे जाताच श्रीरामकृष्ण म्हणाले " आलास बाबा, ठीक झाले. हे पहा माझ्या आजारा बद्दल सर्व डॉक्टर वैद्यानी हात टेकले आहेत तुला काहीं जादू टोणा येत असेल तर काही इलाज करून बघ बरा झालो तर." नागमहाश-यानीं खालीं मान घालून विचार करून मनाशीं ठरविले की, त्याचे दुःख मानसिक शक्तीने आपण आपल्या शरीरावर घ्यावे. असा विचार ठरताच अपूर्व उत्साहाने ते म्हणाले, " हा हा, आपल्या कृपेने मला सर्व काहीं समजते. आपला सर्व रोग आत्ता नाहीसा करतो पहा. " असे म्हणून नागमहाशय श्रीरामकृष्णाजवळ गेले. श्रीरामकृष्णानी नागमहाशयाचे मनोगत जाणिलें, व त्याना जवळून दूर सारून ते म्हणाले " हा समजले, तू माझा रोग बरा करशील खरे!"

श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन होण्य पूर्वी ५–७ दिवस नागमहाशय त्याच्या-कडे गेले. घरात पाऊल टाकताच, " या वेळेला कुठे एकादा आवळा

सापडेल का ? तोंडाला चव कशी ती बिलकुल नाहीं. आवळ्यानें तोंडाला काहीं तरी चव येईल असे वाटते. " असे श्रीरामकृष्णाचे शब्द त्याच्या कानावर पडले. तेथे असलेल्या भक्तगणापैकीं एकजण म्हणाला, "महाराज, ही वेळ आवळ्याच्या हगामाची नाहीं, तेव्हा आवळा या वेळी कोठे सापडावा ?" नागमहाशय मनात म्हणाल "ज्या अर्थी आवळ्याची गोष्ट श्रीरामकृष्णाच्या मुखातून बाहेर पडली आहे, त्या अर्थी कुठे तरी एकादा आवळा सापडेलच यात शका नाहीं." श्रीरामकृष्णाची कोणतीही का इच्छा असेना, ती कोणत्याही मार्गाने पूर्ण होईच होई. मागे एकदा श्रीरामकृष्णाना साखरलिबू खाण्याची इच्छा झाली होती व त्या बाबतींत त्याचे व स्वामी अद्भुतानद याचे बोलणे चालले होते, तोच नागमहाशय साखरलिंबू घेऊन तेथे उपस्थित झाले होते, व श्रीरामकृष्णानीं मोठ्या प्रेमाने ते साखरलिबू खाल्ले होते. ही गोष्ट नागमहाशयास आठवताच कोणाशीं काहीही न बोलता, ते आवळ्याच्या शोधाकरिता निघाले. २-२॥ दिवस सर्व बागातून त्यानीं आवळ्याचा तपास केला, पण व्यर्थ. शेवटीं तिसऱ्या दिवशीं एका बागेत एक आवळा सापडला, तो घेऊन ते श्रीरामकृष्णाकडे गेले. त्यानी तो एकाद्या लहान मुलाप्रमाणे मोठ्या आनदाने घेतला व म्हणाले " अहाहा ! इतका सुदर आवळा तू या भलत्या वेळीं कोठून मिळविलास ?" नतर नागमहाशयाची खाण्याची व्यवस्था करण्यास त्यानीं स्वामी रामकृष्णानदास सागितले. नागमहाशय श्रीरामकृष्णाजवळ बसून त्याना पख्याने वारा घालू लागले. स्वयपाक तयार झाल्याचे रामकृष्णानदानी कळविले, पण नागमहाशय जागचे हालले नाहींत. शेवटी श्रीरामकृष्णानीं खालीं जेवण्यास जा असे सागताच, ते उठून खाली येऊन आसनावर बसले. नागमहाशयास सर्वांनीं जेवण्यास आरभ करा म्हटले, पण ते खाद्य द्रव्याला स्पर्श न करिता स्वस्थ बसून राहिले. त्या दिवशीं त्याना एकादशीचा उपवास होता. त्यानीं मनाशीं ठरविले होते की, श्रीरामकृष्ण जर प्रसाद देतील तरच व्रतभग करावयाचा, नाहीतर नाहीं. परतु त्यानीं आपला मनोदय व्यक्त केला नव्हता. नागमहाशयानीं जेव्हा कांहींच खाल्ले नाही, तेव्हा श्रीरामकृष्णा-

नदानी ही हकीगत श्रीरामकृष्णास कळविली. तेव्हा ते म्हणाले " अरे त्याचे पान येथेच घेऊन ये बघू." त्याप्रमाणे स्वामी रामकृष्णानदानीं सर्व खाद्य पदार्थ वाढलेले पान श्रीरामकृष्णापुढे आणून ठेविले. श्रीरामकृष्णानीं सर्व पदार्थांना जिभेचा स्पर्श केला व म्हणाले, " आता हे पान त्याला दे म्हणजे तो खाईल " रामकृष्णानदानीं ते पान पुन्हा नागमहाशयाच्या पुढे ठेवताच त्यानीं " प्रसाद ! प्रसाद ! महाप्रसाद ! " असे म्हणून त्या पानास साष्टाग नमस्कार घातला व मग खावयास आरभ केला ! शेवटी ते पान देखील त्यानी खाऊन टाकिले ! प्रसाद म्हणून दिलेली कोणतीही वस्तू ते सर्व खाऊन टाकीत, त्यातील काहींही शिल्लक ठेवीत नसत !

रामकृष्णानद म्हणत " अहाहा ! नागमहाशयाची केवढी श्रद्धा त्या दिवशी आमच्या नजरेस पडली !" त्या दिवसापासून श्रीरामकृष्णांची भक्त मडळी नागमहाशयास कधींही पानावर प्रसाद देत नसत, क्वचित् दिल्यास, त्याचे खाणे सपल्याबरोबर त्यानी पानही खाऊ नये म्हणून, ते त्याच्या हातातून काढून घेत. ज्या फळात बी असते, असे फळ त्यांना द्यावयाचे झाल्यास बिया काढून मग देत असत इ. स. १८८६ सालीं श्रावण व॥ अमावास्या रोज रविवार या दिवशीं श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाले. नागमहाशयास हे वर्तमान कळताच ते स्मशानात गेले, तेथून आल्यावर पाणी देखील तोडात न घालता ते तसेच पडून राहिले.

श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यावर स्वामी विवेकानदच सर्व भक्ताचे आश्रयस्थान झाले. तेच सर्व भक्ताची विचारपूस करीत. स्वामीजींनीं ऐकिले की श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यापासून नागमहाशय एक लेप पाघरून, काही अन्न न घेता पडून राहिले आहेत, स्नान शौच यालाही उठत नाहीत. तेव्हा स्वामी अखडानद व तुरियानद यास घेऊन स्वामीजी त्याच्या घरी आले पुष्कळ हाका मारल्यावर नागमहाशय उठले स्वामीजी त्याना म्हणाले, " आज आम्ही आपले येथे भिक्षेस आलो आहोत " नागमहाशय तावडतोब उठले, व बाजारातून सर्व वस्तू विकत घेऊन आले. तोपर्यंत हे अतिथित्रय स्नाने आटोपून एका मोडक्या

तक्तपोशावर श्रीरामकृष्णाच्या गोष्टी बोलत बसले होते नागमहाशयानी तीन पाने वाढून तयार केली. स्वामीजीनी त्याच्याकरिता म्हणून चौथे पान तयार करण्यास सांगितले, व त्या पानावर बसण्यास नागहाशयास पुष्कळ प्रकारे सांगितले, पण ते मुळींच बसले नाहीत तेव्हा स्वामीजी म्हणाले, "बर तर ते मग बसतील." आहारानतर ते विश्रांती करीत असता स्वामी पुन्हा नागमहाशयास जेवण्यास सागू लागले, तेव्हा नागमहाशय म्हणाले "हाय हाय! आज देखील या देहाला भगवत्कृपेचा लाभ झाला नाही, आणखी त्याला आहार देऊ? छे, माझ्या हातून तर ते होणे शक्य नाही" स्वामीजी म्हणाले, "ते काही नाही. तुम्ही जेवलेच पाहिजे, नाहीतर आम्ही येथून हालणारच नाही," वगैरे अनेक प्रकारे समजाविल्यावर त्यानी आहार केला श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यावर त्याचे बागबाजार येथील प्रसिद्ध भक्त बलराम बसू यानी नागमहाशयास पुरी धामीं रहाण्याचा विशेष आग्रह केला, तसेच पालबाबूनींही नवद्वीप येथे रहाण्याचा आग्रह केला, व त्याचा सर्व खर्च चालविण्याचे दोघानीही कबूल केले, पण नागमहाशय म्हणाले "श्रीरामकृष्णानी मला घरीच रहाण्यास सांगितले आहे, त्याची आज्ञा तिळमात्र उल्लंघन करणे मला शक्य नाही." कोणाचेही काही न ऐकता श्रीरामकृष्णाच्या आज्ञेप्रमाणे ते देशात आपल्या घरी जाऊन राहिले. ते जाण्यापूर्वी एका सद्गृहस्थानी ५० रुपये महिन्यावर आपले घरवैद्य म्हणून रहाण्याचा त्याना फार आग्रह केला, पण त्यानीं ते कबूल केले नाहीं.



# प्रकरण पांचवें.



## देशांत आगमन.

घरी आल्यावर नागमहाशयानी अगदी मनोभावान पित्याची सेवा करण्यास सुरवात केली दीनदयाळ अगदी थकून गेला होता. नागमहायाना कधी कधी त्याचा हात धरून स्नानास व शौचास न्यावे लागे. त्याची शय्या ते स्वतः घालीत त्याना जे काही खाण्याची इच्छा होई, ते हरप्रयत्न करून ते तयार करून देत. दीनदयाळ एके दिवशी धि'कारपूर्वक म्हणाला, " दुर्गाचरण तर व्यवसाय करीत नाही पुष्कळ लोक दुर्गापूजा करितात मला जर शक्ती असती तर मी देखील दुर्गापूजा केली असती, पण ते माझ्या नशिबात नाही." नागमहाशयानी हे ऐकिले, व तेव्हापासून त्यानी पित्याच्या सतोषार्थ प्रतिवर्षी दुर्गा, काली, जगद्धात्री व सरस्वति याचे उत्सव सुरू केले.

दीनदयाळ यास एक घटका देखील ससार-चिता करण्यास ते अवसर मिळू देत नसत. नेहमी त्याच्यादवळ बसून भागवत वगैरे पुराणग्रथ वाचीत असत नागमहाशयाच्या या नित्य क्रमाने दीनदयाळचे मन थोडे थोडे पालटू लागले नागमहाशय दरवर्षी शारदापूजेकरिता लागणाऱ्या वस्तूची खरेदी करण्याकरिता कलकत्त्यास येत एक वेळेस याप्रमाणे ते आले असता सुरेशला म्हणाले, " बाबाना आता ससार चिंता नाही त्याचे मन हल्ली पालटले आहे. नेहमी ईशचितन व धर्मकथा यातच ते मग्न राहतात."

पूर्व बगाल तत्रप्रधान देश असल्यामुळे, तेथे भक्तीपेक्षा सिद्धीचेच माहात्म्य ज्यास्त होते. स्वामी विवेकानद प्रस्तुत लेखकास एकदा म्हणाले " अरे तुझ्या या पूर्व बगाल प्रातात वैष्णव व तात्रिक याचेच मला महत्त्व दिसले. त्या प्रातासारखा वामाचारी व सिद्धीच्या पाठीमागे लागलेला प्रात क्वचितच सापडेल." श्रीरामकृष्ण एकदा नागमहाशयांस

म्हणाले " कारे, तुझ्या प्रातातले साधूसत कसे आहेत ?" तेव्हा नागमहाशय म्हणाले " मला तर आमच्या देशात कोणाही सागण्यासारखा साधू-भक्ताचे दर्शन झाले नाहीं. " श्रीरामकृष्ण म्हणत " ज्या प्रदेशात गगा नाहीं, त्या देशात ईश्वरभक्त कधींही जन्म घेत नाही. तार्किक पडित पुष्कळ जन्मतात, परतु गगामाईच्या तीरीं जन्म न घेतला, तर शुद्ध भक्तीलाभ होणे कठीण." नागमहाशय देशात जाऊन रहाण्यापूर्वी काहीं दिवसापासून, श्रीयुत नटवर गोस्वामी व विजयकृष्ण गोस्वामी, शुद्धाभक्ती तत्वावर तेथे प्रवचन करीत हिंडत होते.

नागमहाशयाना ठाऊक होते की, श्रीयुत विजयकृष्ण हे रामकृष्ण भक्त आहेत. देशात आल्यानतर एकदा त्याना डाक्का येथे जावे लागले. तेथे विजयकृष्ण याची व त्याची गाठ पडली. विजयकृष्णाची व नागमहाशयाची ओळख नव्हती, परतु हीन दीन वेशाने कोणी तरी महापुरुष आपल्याला दर्शन देण्यास येत आहे, असे त्यानी अतर्दृष्टीने जाणले. ते एकमेक बोलत असता, नागमहाशय हे श्रीरामकृष्णभक्त आहेत असे जेव्हा विजयकृष्ण याना कळले, तेव्हा तर त्याचा आनद द्विगुणित झाला, व त्याचा त्यानी चागला आदर सत्कार केला. नागमहाशयासही त्याच्या भेटीने परमानद झाला. परतु ते म्हणत " प्रत्यक्ष श्रीरामकृष्णाचे दर्शन झालें असून, हे इतर साधूच्या चरणावर लोटागण घालत का फिरत आहेत, हे एक मोठे आश्चर्य आहे. " विजयकृष्णाचे बारदी येथील ब्रह्मचाऱ्याकडे येणे जाणे असे. नागमहाशय त्या बाबतींत म्हणत " विजयकृष्णासारख्या मोठ्या लोकानाही मतिभ्रम होतो तर इतराची काय कथा ? " विजयकृष्ण श्रीरामकृष्णाजवळ बसून डोळे मिटून ध्यान करितात असे एकदा गिरीशने ऐकिले, तेव्हा तो म्हणाला, " प्रत्यक्ष परमेश्वर समोर बसला असता, त्याच्यासमोर डोळे मिटून बसणारा हा कसला मनुष्य आहे बोवा ? " ही गिरीशची उक्ती नागमहाशयांस आठवतांच गिरीशाच्या अतुल बुद्धिमत्तेची प्रशसा करून " जयरामकृष्ण! जयरामकृष्ण! " म्हणून गिरीशला उद्देशून ते नमस्कार करीत असत.

पूर्व बगाल्यात वारदीच्या ब्रह्मचऱ्याचे विशेष प्रस्थ व मानमान्यता होती. त्याचा शिष्य ब्रह्मानद याच्या विशेष आग्रहामुळे,नागमहाशय एकदा बारदी येथे गेले होते. ब्रह्मानदाचे पूर्वाश्रमीचे नाव ताराकान्त गगोपाध्याय असे होते. ते वकिली करीत असत. साधूसेवा, सकीर्तन, साधन, भजन इकडे त्याचा विशेष ओढा होता. पुढे हळू हळू त्यानी वकिली सोडून साधन भजनात आपले मन गुतविले. ताराकान्त नेहमी नागमहाशयाकडे येत असत कधी कधीं १०–१५ दिवस देवभोग येथे त्याच्या घरींच रहात. काहीं दिवसानतर ताराकान्त वरील ब्रह्मचाऱ्याकडे जाऊ लागले. ताराकान्त स्वतःला कधी कधीं त्या ब्रह्मचाऱ्याचे शिष्य म्हणवीत व कधी तर आपण त्या ब्रह्मचाऱ्याचे पूर्व जन्मीचे गुरु आहोत असे सागत ! एक दिवस देवभोग येथे येऊन ते नागमहाशयास म्हणाले "मला माझ्या पूर्व जन्माचे स्मरण झाले आहे, व हल्ली मी चद्र, सूर्य, ब्रह्मलोक वगैरे ठिकाणीं भ्रमण करू शकतो धर्माधर्म सर्व असत्य असून ज्ञान हेच फक्त सत्य होय."

वरीलप्रमाणे ताराकान्ताचे भावातर झालेले आठवून नागमहाशय म्हणत, "यथार्थ गुरु व उपदेशक नसल्यामुळे उच्च दर्जाचे साधकही विपथगामी बनतात."

ब्रह्मचाऱ्याकडे चलण्याबद्दल ताराकान्त नेहमी नागमहाशयाना आग्रह करीत असे, म्हणून नागमहाशयानीं जाण्याचे कबूल केले. व त्याप्रमाणे नारायणगज येथून काही मिठाई, फळे.वगैरे विकत घेऊन ते एकदा त्या ब्रह्मचाऱ्याकडे गेले तेथे गेल्यावर त्यानीं बरोबर आणलेली मिठाई व फळे त्या ब्रह्मचाऱ्याच्या पुढे ठेवली, परतु त्याने त्याकडे ढुकूनही पाहिले नाहीं, उलट, ते सर्व पदार्थ उचलून जवळच उभा असलेल्या बैलाला खाऊ घातले ! नागमहाशय याचे शुष्क व रुक्ष शरीर पाहून ब्रह्मचारी उपहासपूर्वक हासू लागला. नागमहाशय खालीं मान घालून स्तब्ध बसून होते. त्याची स्तब्धता पाहून ब्रह्मचारी विशेष उत्तेजित होऊन श्रीरामकृष्णांच्याविरुद्ध वाटेल तसे अद्वातद्वा बोलू लागला. ते ऐकून मात्र नागमहाशय क्रोधाने लाल झाले ! त्यांचा

क्रोध अनिवार होऊन,अगातून विस्तवाच्या ज्वाळा निघाव्या, तसा त्याच्या सर्वांगाचा भडका उडाला. आपल्याजवळ एक भयकर मुद्रेचा काळभैरव उभा राहून, ब्रह्मचाऱ्याला ठेचून टाकण्याबद्दल अनुमति मागतो आहे असे त्याना दिसले ! नागमहाशयानी आपला क्रोध आवरून धरला व म्हणाले " हाय हाय श्रीरामकृष्ण ! आपली आज्ञा उल्लघून मी साधूदर्शनास का आलो ? माझी मती भ्रष्ट कशी झाली " असे म्हणून ते आपलेच डोके फोडून घेऊ लागले ! नतर " हा रामकृष्ण ! हा रामकृष्ण ! असे म्हणून तेथून पळत निघाले ब्रह्मचाऱ्याच्या दृष्टीआड झाल्यावर मग शातपणे रस्ता चालू लागले. घरी आल्यावर त्यानी पुन्हा कधीही साधूदर्शनास न जाण्याची प्रतिज्ञा केली. कोणी दर्शनास चलण्याचा आग्रह केलाच तर ते गाऊ लागत " रे मना, ऐक सज्जना, उगिच वणवणा, फिरुनि का दमसी, फिरुनी का दमसी ॥ तू बुडी मारुनी राहि चिदानदरसीं ॥ '

कोणत्याही सासरिक घटनेने नागमहाशय अस्थिर होत नसत, पण गुरुनिदा ऐकताक्षणी मात्र या शात व आनदी सत्पुरुषाची वृत्ति अस्थिर होई नारायणगज येथील एक सद्गृहस्थ नागमहाशयाच्या श्वशुरगृहीं बसून, एक दिवस श्रीरामकृष्णावर वाटेल तसे तोंडसुख घेत होते. नागमहाशयानीं त्याना नम्रपणे तसे न करण्यास विनविले. नागमहाशय त्याना जितक्या नम्रपणाने तसे न करण्याविषयीं विनवू लागले, तितका त्याना जास्तच जोर येऊ लागला. शेवटी नागमहाशय म्हणाले " या घरीं बसून तरी श्रीरामकृष्णाची विनाकारण नालस्ती करू नका." तरी ते गृहस्थ ऐकेनात नागमहाशय पुन्हा म्हणाले " येथून तुम्हीं चालते व्हा, नाहीतर भयकर प्रसग ओढवेल," तरी त्या गृहस्थाला त्याचे काहीच न वाटता त्याचा सूर अधिकच चढत चालला. तेव्हा मात्र नागमहाशयाचा क्रोध अनावर झाला, व त्याच्या डोळयातून जणू ठिणग्याचा वर्षावच होऊ लागला. क्रोधाने बेभान होऊन, त्यानीं त्या गृहस्थाची पाठ जोड्याने चागली सडकली व मारत असताना म्हणाले, " चालता हो गाढवा येथून. येथे बसून श्रीरामकृष्णाची निंदा करतोस ? " गृहस्थ एक वजनदार धेड होते. मार खाल्यावर जाता जाता ते म्हणाले "बर बर, पाहून घेईन

तुझा कसा काय साधूपणा आहे तो याची प्रचीती लौकरच येईल." त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून नागमहाशय म्हणाले, "हाय रामकृष्ण तुमची निदा करणाऱ्या लोकाना तुम्ही कशाला माझ्याकडे पाठविता ? धिःकार असो या गृहस्थाश्रमाला" काही वेळाने त्याचे मन शात झाले. काही दिवसानतर वरील गृहस्थ त्याच्याकडे आले व क्षमा मागू लागले. नागमहाशयानी त्याला क्षमा करून आपल्याजवळ बसविले, व तबाखूची चिलीम भरून त्याला दिली, व ते गृहस्थ घरी जाण्याचे वेळी कदील घेऊन त्याना लाबपर्यत पोचविले ! साधूच्या हातच्या माराने वरील गृहस्थ सच्छील बनला !

ही गोष्ट गिरीश बाबूनी ऐकली, व नागमहाशय कलकत्त्यास आले तेव्हा ते त्याना म्हणाले, "आपण तर जोडा घालीत नाही, पण त्याला मारण्यास आपल्याला जोडा कोठे सापडला ?" तेव्हा नागमहाशय म्हणाले "का बरे, त्याचाच जोडा घेऊन त्याला मारिले !" असे म्हणून 'जय-रामकृष्ण ! जयरामकृष्ण !" असा गजर करून, गिरीश बाबूना नमस्कार करू लागले. गिरीश बाबू म्हणत "नागमहाशय खरोखरीच फणाधारी नाग होते !"

एक दिवस नागमहाशयाबरोबर प्रस्तुत लेखक बेलुड मठात जात होता. भाड्याची नौका असलेमुळे तीत नाना प्रकारचे लोक होते नागमहाशय एका बाजूला अगदी बावरल्यासारखे बसले. नौका पाल बाबूच्या घाटाजवळ आल्यावर मठ दिसावयास लागला. नागमहाशय प्रस्तुत लेखकास मठ दाखवून, वारवार मठाला नमस्कार करू लागले. नागमहाशयाचे कृत्य पाहून नावेतील एक व्यक्ती त्या मठाची नानातऱ्हेने निदा करू लागली, व गमत म्हणून आणखी दोघाजणानी त्यात भाग घेतला. निदा ऐकून नागमहाशय अस्थिर झाले. दोन्ही हाताच्या मुठी वळून पहिल्या निदकाच्या तोडासमोर करून ते म्हणाले "अरे ! तुम्ही तर लबाड्या व पैसा याच्यात सार्थक मानणारे ! तुम्हाला मठाचे काय ज्ञान ? तुम्ही डोळ्यात खुट्या मारून बसले आहात. निरर्थक साधूनिंदा करणाऱ्या तुमच्या जिव्हेला धिःकार असो !" नागमहाशयाची ती उग्र

मूर्ति पाहून निंदक नावाड्याला बोलावून म्हणाला, "अरे लावा, लावा, नौका येथेच काठाला लावा, मी येथेच उतरून जातो" वरील गोष्ट जेव्हा लेखकाकडून स्वामी विवेकानदाना कळली, तेव्हा ते म्हणाले "ठिकठिकाणीं नागमहाशयासारखे सिह असण्याची अत्यत जरुरी आहे." पुढे म्हणाले "अरे, ही काय नक्कल आहे काय ? हे तर अस्सल सोने."

बारदीच्या ब्रह्मचाऱ्याचा एक शिष्य होता, तो कधीं कधी नागमहाशयाकडे येत असे. एक दिवस सदरहु शिष्य येऊन नागमहाशयास म्हणाला "आपल्या भेटीनतर ब्रह्मचाऱ्याने आपल्या मुखातून रक्त पडून एक वर्षाच्या आत आपला मृत्यु होईल असा शाप दिला आहे." नागमहाशय हासून म्हणाले, "असल्या शापाने माझा एक केसही वाकडा होणार नाही." एक वर्ष झाल्यावर शाप विफल झाला असे पाहून, ब्रह्मचाऱ्याचे शिष्यत्व सोडून वरील शिष्य नागमहाशयाचा भक्त बनला, व त्याची भक्ती मार्गांत त्वरित उन्नत्ति झाली. नागमहाशय म्हणत, "बारदीच्या ब्रह्मचाऱ्याने पुष्कळ ससारी माणसाना वेदात ज्ञानाच्या कथा सागून त्याचे मेदू बिघडवून टाकिले आहेत. ससारी माणसाना ज्ञानमार्गाचा उपदेश योग्य नाही."

नागमहाशयाचे घरीं एक दिवस एक सन्यासी आला अगावर वस्त्र नव्हते म्हणूनच त्याला सन्यासी म्हणावयाचे इतकेच. गृहस्थावर त्याचा मोठा कटाक्ष. ईश्वरानुराग असो वा नसो पण त्याला गाजाची फार विलक्षण आसक्ति होती. गाजा ओढण्यात प्रत्यक्ष महादेवाशिवाय कोणी त्याची बरोबरी करणारा नसेल ! सन्यासी नग्न वेषातच येत होता, परतु लाबून नागमहाशयास पहाताच, जवळचे वस्त्र नेसला व नागमहाशयाच्या जवळ येऊन सिद्धीच्या गोष्टी बोलू लागला. तेव्हा नागमहाशय म्हणाले "हे सर्व भाव अगदीं हलक्या दर्जाचे आहेत, आणि म्हणूनच ते शुद्धाभक्तीचे विरोधी आहेत." त्याच्या गोष्टीकडे लक्ष न देता सन्यासी म्हणाला 'मी सात दिवस विष्ठा खाऊन राहू शकतो.'

**नागमहाशयः**—त्यात काय मोठी बहादुरी ? कुत्रे सुद्धा विष्ठा खाऊन राहू शकते.

**संन्यासीः**—मी सर्व आयुष्य दिगबर वृत्तीनेच राहिलो आहे.

**नागमहाशयः**—वेडे, उन्माद झालेले, पशुपक्षी, सर्व जतु हे देखील आजन्म दिगबर राहातात. त्यात काय बहादुरी ?

**संन्यासीः**—मी वृक्षाच्या खालीच नेहमीं रहात असतो.

**नागमहाशयः**—कितीतरी जीवजतु वृक्षाच्या आश्रयाने आजन्म राहतात ! हे काही प्रशसा करण्यासारखे नाहीं.

सन्याशाने आणखी पुष्कळ सिद्धीच्या गोष्टी सागितल्या.नागमहाशयाचा परम प्रिय भक्त नटवर याने शेवटी त्यास बडगा दाखविला, तेव्हा सन्याशाने पलायन केले. सिद्धीच्या बाबतीत नागमहाशय म्हणतात, " सिद्धी मिळविणे हे काय फक्त पाच मिनिटाचे कार्य पाच मिनिटात कोणतीही सिद्धी प्राप्त करून घेता येते "

साधारणतः वरीलप्रमाणे साधू सन्यासी त्या वेळी पूर्व बगाल्यात होते व त्याची तेथे प्रतिष्ठाही होती नागमहाशयाचा दीन हीन भाव, मलीन वेष, विशेषतः त्याचे जनरीतीप्रमाणे ससारकर्म करणे, वगैरे गोष्टीमुळे पहिल्याने लोकाना ते महापुरुष आहेत म्हणून कळून येत नसे. परतु एकदा ज्याचा त्याच्याशी परिचय होई, त्याला कळून येई की, हेच हीन दीन गृहस्थ मनुष्यरूपी देवता आहेत.

लेखकाचा नातेवाईक दीनबधु मुखोपाध्याय हा एकदा लेखकाबरोबर देवभोग येथे आला होता. तो चागला गाणारा असल्यामुळे, त्याचे "प्रसाद पदावली" गाणे ऐकून नागमहाशय अतिशयच सतुष्ट झाले. दीनबधु म्हणाला " नागमहाशयासारखा महापुरुष अजून मी पाहिला नाहीं. शास्त्रात विदुरादि महात्म्याची कथा आहे, नागमहाशयाना पाहून मनात येते की हे त्याच्यापेक्षा कोणत्याही बाबतींत कमी नाहीत. मला तर वाटते की विदुरच पुन्हा नागमहाशयरूपाने जन्माला आलेले आहेत."

लेखकाचे श्वशुर श्रीयुत मदन मोहन बारुडी महाशयानीं लोक मुखाने ऐकिलें कीं, आपल्या जामाताने नागमहाशयाच्या सहवासाने अभ्यास व

ससारधर्म याची अनास्था माडली आहे. हे कितपत खरे आहे हे जाण-ण्यासाठी मदनमोहन एक दिवस देवभोग येथे येऊन पोहचले नागमहा-शयास पहाताच त्याची सर्व चिता नाहीशी झाली. मदन बाबू नागमहा-शयाची सरळ वागणूक, आदरसत्कार व त्याची अनासक्त वृत्ती याने मोहून गेले, व म्हणाले "आमचे जामात अशा महापुरुषाकडे जाणे येणे करितात, तेव्हा त्याच्या वागतीत भीति किंवा चिता करण्याचे काहीच कारण नाही "

श्रीरामकृष्ण म्हणत "फूल फुलले की भ्रमराला बोलावणे करणे नको" सत्सगप्रिय व धर्मानुरागी असे लोक एका मागे एक नागमहाशयाकडे येऊ लागले व क्रमाने लाबलाबचे लोक देखील येण्यास सुरुवात झाली कधी तर मुन्सीफ डेप्युटी वगैरे बडे अधिकारी लोकही येत. एक दिवस नागमहा-शय आपल्या पत्नीला म्हणाले, "श्रीरामकृष्णाचा शेवटचा आशिर्वाद आता पूर्ण झाला. येथे येतात ते सर्व यथार्थ धर्मानुरागी आहेत कारण श्रीरामकृष्ण तसेच म्हणाले होते त्याचा आदरसत्कार कर म्हणजे तुझे कल्याण होईल." अधिकारी वर्गापैकी कोणी आल्यास ते त्याला वदन करीत व म्हणत "महाशक्तीच्या इच्छेने इग्रज देशाधिपति झाले आहेत त्याचा अवमान केल्यास भगवतीची अवकृपा होईल " ते इग्रजी राज्याचे विशेष पक्षपाती होते. ते म्हणत "श्रीजगदबा, महाराणी रूपाने अवतरली आहे, म्हणूनच इग्रजाचा अभ्युदय होत आहे, व त्याच्या राज्यकारभारात प्रजा सुखी आहे." युद्धासबधाने नागमहाशय म्हणत "जगात रजो-गुणाच्या योगाने नित्य मारामारी कापाकापी चालते. सत्व वृत्तीत रहा-ण्याचा प्रयत्न न केल्यास हिसावृत्ति नाहीशी होत नाही."

नागमहाशयाच्या जे भेटीस येत त्याना ते काही खावयास घातल्या-शिवाय सोडीत नसत. जे दोन तीन दिवसाचा रस्ता चालून आलेले असत, त्याची रहाण्याची सर्व व्यवस्था ते करीत. ज्याची जितके दिवस रहाण्याची इच्छा असेल तितके दिवस त्याने त्याच्या येथे खुशाल रहावे. पूजामडपासमोर दक्षिणेकडच्या बाजूचे घर अतिथीकरिताच त्यानी राखून ठेविले होते. त्याच्या घरच्या सर्व मडळींना अतिथी सत्काराची

मोटी हौस होती दीनदयाळ म्हणे " कोणत्याही तऱ्हेने का होईना, जे काही ब्राह्मणाच्या तोंडी पडते त्याच्याच योगाने स्वर्गलाभ होतो. काहीही असो, अतिथी ब्राह्मण याना या दीन दरिद्र्याच्या कुटीत कसेतरी दोन मुटी अन्न मिळतेच. हेच माझे परम भाग्य आहे " नागमहाशय म्हणत "ही सर्व श्रीरामकृष्णाची लीला श्रीरामकृष्ण लीलासमर्था शरीराने एक होते हल्ली तेच नानारूपाने आपल्यावर कृपा करण्याकरिता येतात." नागमहाशय यथार्थ नारायण भावनेने अतिथींची सेवा करीत.

एक दिवस नागमहाशय पोटशूळाने आजारी पडले वेदनेमुळे मध्ये मध्ये ते बेशुद्ध होत. घरात तादूळ नाहीत, अशा वेळी ८–१० जण अतिथी येऊन उभे राहिले तेव्हा तशा स्थितीतच ते बाजारात गेले. नागमहाशय कधीही ओझ्याकरिता मजूर करीत नसत, आणणे नेणे ते स्वतःच करीत त्याप्रमाणे त्या दिवशी तादुळाची गाठोडी डोक्यावर आणीत असता पोटातील वेदना वाढू लागल्या चालता चालता ते रस्त्यात पडले, व म्हणाले " हाय, हाय श्रीरामकृष्ण ! आज हे काय केलेत ? घरात नारायणस्वरूपी अतिथी आले आहेत आणि त्याच्या सेवेला तर मला विलब होत आहे धिःकार असो या हाडामासाच्या पिंजऱ्याला ! याच्या हातून आज ईश्वराची सेवा झाली नाही ! " वेदना जरा कमी झाल्यावर बोजा डोक्यावर घेऊन नागमहाशय घरी आले, व आलेल्या अतिथींना नमस्कार करून म्हणाले, " हाय ! हाय! आपल्या सेवेला आज विलब झाला, आज माझ्याकडून फार भयकर अपराध घडला ! "

एके दिवशीं रात्री ५–६ जण अतिथी आले, परतु घरात तादूळ बिलकूल नव्हते, दुकानेही बद झालीं होती. नागमहाशयाची पत्नी हातात टोपले घेऊन तादूळ उसने आणण्याकरिता घराबाहेर पडली. हे पाहून आम्हाला फार वाईट वाटले. पण नागमहाशय त्यावेळी म्हणाले "ही सर्व श्रीरामकृष्णाची इच्छा, व त्याचीच दया ! ते फक्त सत्व पहात आहेत, दुसरे काय ? "

पावसळ्यात एके वेळीं २ अतिथी त्याच्याकडे आले. त्या दिवशी

पावसाची सतत धार चालू होती. नागमहाशयाच्या ४ खणी घरापैकी ३ खण गळू लागले. जो एक चौक चागला होता तेथे नागमहाशय निद्रा करीत असत. आलेल्या अतिथीद्वयाचे भोजन झाले, परतु त्याना निजावयास जागा कोठे द्यावयाची ? याचा ते विचार करू लागले. नागमहाशय पत्नीला म्हणाले, " आज आपले भाग्य फार मोठे आहे, या साक्षात् नारायणाकरिता तू थोडेसे कष्ट सहन करणार नाहींस काय ? ये आपण घराच्या कोपऱ्यात बसून हरी नामाचा जप करीत करीत रात्र घालवू ! " त्याप्रमाणे आपली जागा अतिथींना देऊन, त्या दोघेही जणानीं घराच्या कोपऱ्यात बसून, श्रीरामकृष्णनामस्मरणात ती रात्र घालविली !

सामान्य गृहस्थाचा आय व्यय ज्याप्रमाणे ठराविक असतो त्याप्रमाणे नागमहाशयाचे नव्हते. ठेक्याचे उत्पन्न दरवर्षी सारखे नसे. इकडे अतिथींची सख्याही नियमित नव्हती, म्हणून प्रपचात कधीं कधीं पुष्कळ गोष्टीची तूट येई. जेव्हा घरातील वस्तु सपून जात, तेव्हा नारायणगज वगैरे गावातील ओळखीच्या दुकानदाराजवळून नागमहाशय माल उधारीने आणीत, व वर्षाच्या शेवटी जे काहीं रणजित कडून येई, त्यातून जे देणे असेल ते देऊन टाकीत. बाजारात नागमहाशयाची जशी पत असे, तशी मोठमोठ्या लोकाचीही नसेल. नागमहाशयाचा एकाच दुकानात सामान घेण्याचा नियम होता, ते म्हणत "ज्याला सत्याची आवड असते, त्याचे सत्यच नेहमी रक्षण करिते, व ईश्वरही त्यावर कृपा करितो." ज्याच्या दुकानात नागमहाशय सामान घेत, त्या दुकानदाराची त्याच्यावर विशेष भक्ती होती. दुसऱ्याला तो ज्या दराने माल देत असे, त्यापेक्षा स्वस्त दराने तो नागमहाशयास देई. हे त्याना कळताच " दुसऱ्याना ज्या भावाने माल देतोस त्याच भावाने मलाही देत जा, " असे त्यानी त्या दुकानदाराला चक्क सागितले ! नागमहाशयाच्या हातून ज्या दिवशी बोहोणी होईल त्या दिवशी पुष्कळ विक्री होते, असा सर्व दुकानदार लोकाचा समज होता ! कोळी मासे धरावयास जाण्याचे वेळी, किंवा गवळी दूध विकण्याला जाण्याचे वेळी

त्याना नवस करीत असत ! एक दिवस दुधाची फार जरूरी असल्यामुळे नागमहाशयानीं एका गवळ्याजवळून दूध विकत घेतले. व जवळ मोड नसल्यामुळे त्यानी त्यास एक रुपया दिला. त्यातील बाकीचे पैसे गवळ्याजवळ त्यानीं मागितले नाहींत व गवळ्यानेंही पण परत आणून दिले नाहींत ! आणखी एक दिवस त्याच गवळ्याजवळून त्यानीं दूध विकत घेतले, त्याचे दाम त्याला नगद दिले. मागच्या पैशाची गोष्ट देखील काढली नाहीं ! हा पागल माणूस विसरून गेला असे गवळ्याला वाटले. म्हणून त्याने पूर्वीच्या पैशाची गोष्ट न काढता त्यावेळचे नगद पैसे घेऊन रस्ता धरला ! याप्रमाणे काहीं लोक त्याना फसवीत, पण त्यानीं मात्र कधीं कोणाला दुखविले नाहीं. नागमहाशय कधीं बाजारात गेल्यास, मालाच्या भावाची घासाघीस करीत नसत, दुकानदार जो भाव सागेल त्याप्रमाणे पैसे देत. नागमहाशयाच्या भेटीला एकजण गृहस्थ आले असता ते अत्यत आजारी पडले. नागमहाशयानी ते गृहस्थ चागले होईपर्यंत त्याची उत्तम व्यवस्था ठेविली. नतर त्या गृहस्थाला घरीं पोचविण्याकरिता व चरित्र लेखकाला जावयाचे होते म्हणून, आम्ही भाड्याची नौका ठरविण्यास गेलो. नावाड्याने गैरवाजवी पैसे मागितले म्हणून मी त्याच्याशी बकाबकी करू लागलो, तेव्हा नागमहाशय म्हणाले “ निरर्थक बाचाबाचीत काय अर्थ ? नावाडी कधी खोटे सागणार नाहीं.” शेवटी नावाड्याने जे भाडे मागितले तेच ठरवून त्यानीं त्या गृहस्थाला नावेत बसविले. त्या गृहस्थाजवळ बिलकूल पैसे नव्हते, म्हणून नागमहाशयानींच त्याचे भाडे दिले ! याप्रमाणे पुष्कळाना त्याना प्रवास खर्च द्यावा लागे.

असा खर्च एकसारखा चालल्यामुळे नागमहाशयाना थोडेसे कर्ज झाले, त्याचे ते कर्ज कोणी देऊन टाकू म्हटले, तर ते बिलकुल कबूल होत नसत. पूज्यपाद स्वामी विवेकानद अमेरिकेहून परत आल्यावर त्यानी नागमहाशयाच्या ऋणाची हकीगत ऐकिली, तेव्हा त्यानी मदतीची गोष्ट काढताच नागमहाशय म्हणाले, “ सन्यासीगणाची माझ्यावर जी कृपा आहे ', पुरे, पालबाबूच्या व्यवस्थेने मिळणाऱ्या पैशातून आमचा

ससार कसा तरी खास चालेल !" त्याच्या ऋणासबधी कोणी चिंताग्रस्त झालेला दिसल्यास ते म्हणत, ' ग्वावयास नाही मिळाले तर नाही, पण गृहस्थधर्माचा त्याग मी करू शकत नाही. भगवान् श्रीरामकृष्णाच्या इच्छेस येईल त्याप्रमाणे ते करोत ! "

नागमहाशयानी कधीही चाकर ठेविला नाही. ते घरी असल्यास घराची शाकारणी वगैरे करण्यास मजूर लावण्याची सोयच नव्हती. नागमहाशय बाहेर गावी गेल्यास, त्याची पत्नी लाकूडफोड, घरशाकारणी वगैरे सर्व करून घेत असे. एके वेळी वर्षाधिक काल नागमहाशय घरीच राहिल्यामुळे त्याचे घर सर्व गळू लागले. घराची दुरुस्ती करण्याकरिता त्याच्या पत्नीने एक मजूर लाविला. मजूर घरात येताच नागमहाशय " हाय ! हाय ! " करू लागले, व त्यानी त्याला बसवून घेऊन चिलिम तयार करून दिली ! थोड्या वेळाने मजूर घराचे काम करू लागला. नागमहाशयानी त्याला विनयाने घराच्या खाली उतरण्यास सागितले, पण तो खाली उतरेना, अस्थिर होऊन नागमहाशय डोक्यावर हात मारून घेऊन म्हणू लागले " हाय ! हाय ! श्रीरामकृष्ण ! आपण का मला या गृहस्थाश्रमात राहण्यास सागितले ? स्वतःच्या सुखाकरिता मला अन्य लोकाचे कष्ट डोळ्यानी पहावे लागतात ! धिःकार असो या गृहस्थाश्रमाला ! " त्याची ती व्याकुल अवस्था पाहुन मजूर खाली आला. तो खाली येताच नागमहाशयानीं त्याला पुन्हा चिलिम भरून दिली, व पख्याने त्याला वारा घालू लागले ! त्याचे मन शात झाल्यावर त्यानी त्याला सर्व दिवसाची मजुरी देऊन घरी जाण्यास परवानगी दिली ! नौकेतून जाण्याच्यावेळी ते नावाड्याला नाव चालवू न देता स्वतःच वल्हे मारीत ! इतर बसलेले लोक त्याना परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत, पण ते कोणाचेही ऐकत नसत. नावेत कितीही गर्दी असली, तरी लोकाना ते शक्य तो उभे राहू देत नसत. त्याना कसेही करून जागा करून देत ! पावसाळ्यात देवभोग अगदीं जलमय होत असे. नौकेशिवाय या घरातून त्या घरात जाता येत नसे. नागमहाशयाची स्वतःची अशी नौका नव्हती. त्याची

पत्नी शेजाऱ्यांच्या मदतीनें जळाऊ लांकडें वगैरेची अगोदरच व्यवस्था करून ठेवीत असे.

नित्य सायकाळीं नागमहाशय धूप दीप यानी श्रीरामकृष्णाच्या तस-बिरीची आरती करीत. पुष्कळ मडळी जमल्यास सकीर्तन होत असे. सकीर्तनप्रसगीं नागमहाशय साथ न करिता अगणांत एका बाजूला बसून सर्वांना तबाग्वूची चिलीम भरून देत. नागमहाशय जेव्हा सकीर्त-नात उभे रहात तेव्हा प्रचड जयध्वनि चालत असे. कीर्तनाच्या शेवटीं नागमहाशय केवळ रामकृष्ण नावाचा जयजयकार करीत. नुसत्या कीर्त-नातच नव्हे तर घरातल्या प्रत्येक कामातही त्याचा भक्तिरस उचबळत असलेला दिसून येई. एक दिवस सरस्वती पूजनाचे दिवशी प्रस्तुत लेखक त्याच्या घरीं आला. त्याच्या मुखाने नेहमी नागमहाशय शास्त्र व्याख्या ऐकण्याची इच्छा दर्शवीत. एकच श्लोकाचा पृथक पृथक अर्थ त्याना ऐकविला असता ते म्हणत "हेही खरें व तेही खरे, प्रत्येकाच्या अधिकारानुरूप शास्त्राची व्याख्या झाली आहे. यात व्याख्या करणाराचा काहीही दोष नाही." श्रीरामकृष्णाच्या नाना कथा सागून पुढे म्हणाले "ईश्वराची अनत रूपे ज्याला ज्याप्रमाणे भासलीं त्याप्रमाणे त्याने वर्णन केले. त्याचे अमुकच एक रूप असे कोणीच सागू शकत नाही." मडपामधील देवीच्या मूर्तीकडे पाहून म्हणाले "ही देखील सत्य. या देव देवींची उपासना करून किती तरी लोक मुक्त झाले आहेत" असे म्हणून वार-वार देवीला प्रणाम करू लागले, मडपात पूजासाहित्य तयार होते, पुरोहिताने पूजेला सुरवात केली. नागमहाशय पुन्हा देवीकडे लक्ष करून म्हणाले "आई जगदबा साक्षात् विद्यारुपिणी, तिची कृपा झाल्या-शिवाय कोण अविद्यापार होऊ शकणार आहे ? जगदबेने मला या शूद्र कुळांत जन्माला घातले आहे, म्हणून मला शास्त्राधिकार नाही. आपण (लेखक शरत्चद्र) कृपा करून मला शास्त्र व्याख्या ऐकवा" देवतावर त्याची दृढभक्ति पाहून मला वाटले "नागमहाशय हे फक्त देवता-सिद्ध आहेत, ब्रह्मज्ञ नव्हेत."

माझे वरप्रमाणे विचार चालू आहेत, तोंच नागमहाशय कुठें चालले

झाले. शोध करिता करिता दिसले की स्वयपाक घराच्या पाठीमागे असलेल्या आब्याखाली ते उभे आहेत. त्या वेळी ते पूर्ण भावावेशात होते. मुखाने म्हणाले " जगदबा काय या माती दगडाच्या मूर्तीतच आहे ? छे, ती अनत, सच्चिदानदमयी महाविद्यारुपिणी !" असे म्हणत म्हणत ते गाढ समाधीत मग्न झाले. सुमारे अर्ध्या तासानतर त्याचा समाधिभंग झाला ही गोष्ट लेखकाने त्याच्या पत्नीस सागितली, तेव्हा ती म्हणाली " बाबा, तू तर त्याची ही अवस्था आज पहातोस. कधी कधी तर दोन दोन तीन तीन प्रहरपर्यंत त्याचा समाधिभंग होत नाही. अशा वेळी ' काय आहे कोण जाणे ? ' असे वाटून पोटात धस्स होते "

कधी कधी पुष्कळ लोकसमाज जमला म्हणजे ते म्हणत " जगदबे ! हे काय झाले ?" म्हणून उद्वेगाने कलकत्त्यास पळून जात ! किंवा श्रीरामकृष्णभक्ताना पाहण्याची त्याना उत्कट इच्छा झाली, की त्याच वेळी कलकत्ता गाठीत. असल्या या वेळा खेरीजकरून, वार्षिक दुर्गापूजेचे सामान घेण्याकरिताच फक्त कलकत्त्यास येत.

एका वेळी नवद्वीपहून दोन साधू देवभोग येथे स्वप्नात काही दृष्टात झाल्यामुळे नागमहाशयाचे दर्शनास आले. त्या वेळी नागमहाशय देशी नव्हते, म्हणून ते साधू दोन तीन दिवस तेथे राहून नवद्वीप येथे परत गेले. ही गोष्ट ते घरी आल्यावर त्याना पत्नीकडून कळली.

स्वामी तुरियानद एकदा ज्ञानानदास घेऊन देवभोग येथे नागमहाशयाच्या भेटीस आले, त्या वेळीं वर्षाकाल असल्यामुळे सर्व रस्ते पाण्यात बुडून जाऊन, देवभोग पाण्यात तरगत असल्यासारखे भासत होते. स्वामीद्वय नौकेत बसून नागमहाशयाच्या घरी पोहचले. त्याना पहाताच नागमहाशयानी "जयरामकृष्ण ! जयरामकृष्ण ! " म्हणून पाण्यात उडी घेतली व तेथेच सज्ञाहीन होऊन पडले ! स्वामीद्वयाने त्याना पाण्याबाहेर काढून घरांत नेले.

अमेरिकेहून परत आल्यावर स्वामी विवेकानदाची अशी इच्छा होती कीं, देवभोग येथे काही दिवस राहून खेड्याची राहणी व तेथील स्वच्छदवृत्ति यांचा उपभोग घ्यावा, व तेथील लोकासारखाच कांही दिवस आचार-

विचार पाळावा. नागमहाशयानी त्याची सर्व व्यवस्था करून ठेविली होती, पण त्याच्या हयातीत स्वामी विवेकानदाचे चरण देवभोगाला लागले नाहीत.

---

# प्रकरण सहावें.



## गृहस्थाश्रम व गुरुस्थान.

कलकत्त्यास आल्याबरोबर नागमहाशय आधीं कालीघाटावर जाऊन काली मातेचे दर्शन घेत, नतर कुमारटुलीतील आपल्या घरात सामानाकरिता आणलेली पोती वगैरे ठेवून, पायीच गिरीशकडे जात गिरीशच्या बाबतीत ते म्हणत, " पाच मिनिटे जरी गिरीशच्या सगतीत घालविली, तरी तेवढ्यातच जीवाचा भवरोग दूर होईल. गिरीशची बुद्धि इतकी तीव्र आहे की, कोणाचेही हृद्रत नजरानजर होताच तो ओळखतो, व या बुद्धिबलानेच त्याने सर्वांच्या आधी श्रीरामकृष्णाना अवतार म्हणून ओळखिले." गिरीशचे नाव निघताच त्याला उद्देशून नेहमी नागमहाशय नमस्कार करीत. श्रीरामकृष्णभक्तगणात त्याना ते बऱ्याच उच्चस्थानी लेखीत.

नागमहाशय एका वेळी वार्षिक पूजेच्या पूर्वी कलकत्त्यास आले, तेव्हा प्रस्तुत लेखक त्याच्याबरोबर गिरीशकडे गेला. नागमहाशयास पाहून गिरीशने वरच्या मजल्यावरून खाली येऊन आदराने दोघानाही वर नेले. नागमहाशयानी बिछाइतीवर बसणे सोडले असल्यामुळे ते जमिनीवरच बसले. तेथे असलेल्या गृहस्थानीं त्याना बिछाइतीवर बसण्याचा आग्रह केला असता गिरीश म्हणाला " त्याना त्रास देऊ नका. त्याना ज्यात सुख होईल तेच त्याना करू द्या." पुढे गिरीश बाबूनीं नागमहाशयाना श्रीरामकृष्णलीला सागण्यास सुरवात केली. ऐकता ऐकता नागमहाशय म्हणाले, " मी मूर्ख, दुराचारी, त्याना मीं ओळखले कधीं !

जेणेकरून त्याच्या चरणी माझी भक्ति राहील असे आपण करा.” नागयहाशयाची लीनता पाहून इतर गृहस्थ स्तभितपणे त्याच्याकडे पाहू लागले, तेव्हा गिरीश म्हणाला, “ असे जर नसते तर त्याना अवतार असे मी कशाला मानले असते ? ज्याच्या कृपेने मनुष्याची अशी अवस्था होऊ शकते, त्याना अवतार म्हणू नये तर काय म्हणावे ?” श्रीरामकृष्णाविषयीं अनेक गोष्टी झाल्यावर आम्ही सर्व मडळी गिरीशबाबूची परवानगी घेऊन घरी गेलों.

एके दिवशीं सुरेशाला व लेखकाला बरोबर घेऊन नागमहाशय आलमबाजारातील मठात गेले. त्या दिवशीं तेथे तुरीयानद, निर्मलानद, निरजनानद, प्रेमानद, त्रिगुणातीत वगैरे भक्त मडळी होती. नागमहाशयानी सर्वाना साष्टाग नमस्कार केला. नागमहाशयाच्या आगमनामुळे मठात आनदाची भरती आली. आम्हीं ज्या वेळी तेथे गेलो, त्यावेळी रामकृष्णानद आरती करीत होते. सध्याकाळच्या आरतीचे वेळी नागमहाशयानी स्वतः घाट वाजविली. नतर आम्ही प्रसाद ग्रहण करण्यास बसलो. मागे एकदा प्रसादाचे पान नागमहाशयानी भक्षण केले होते,तेव्हापासून त्याना पानावर प्रसाद देत नसत. म्हणून त्याना ताटात सर्व पदार्थ वाढले. प्रसाद भक्षणानतर नागमहाशयानी कोणाचेही न ऐकता भाडी घासून आणिली. भाडी घासणें झाल्यावर सन्यासीगणाला चिलीम तयार करून दिली त्या रात्री आम्हीं मठातच राहिलो. अतिशय उकाडा होत असल्यामुळे, सुरेश व मी (लेखक) गच्चीवर जाऊन निजलो. नागमहाशयानीं मात्र रात्र जागरणात घालविली. सकाळीं आम्हीं परवानगी घेऊन घरीं आलों. मठात जाण्याची माझी ( लेखकाची ) हीच पहिली वेळ असल्यामुळे, सन्यासी मडळींनीं आम्हाला कधीं कधीं येत जा म्हणून सागितले.

नागमहाशयानीं दक्षिणेश्वर पुष्कळ दिवसांत पाहिले नव्हते म्हणून मला ( लेखकाला ) व सुरेशाला घेऊन एक दिवस ते दक्षिणेश्वर येथे गेले. रस्त्याने, श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाले ती काशीपूरची बाग सुरेशनें बोटाने दाखविली. काशीपूरचे नांव ऐकिले कीं नागमहाशयांना मरणप्राय वेदना

होत, व त्यांच्या अंगावर कांटा येई. त्या बागेकडे त्यांनीं वळूनही पाहिलें नाहीं. पण त्यांचा चेहरा मात्र म्लान झाला होता. श्रीरामकृष्णांचा गळ्याच्या रोगानें देहान्त झाल्याची गोष्ट निघताच नागमहाशय मोठ्यानें म्हणाले " लीला, लीला, केवळ जीवांच्या उद्धारासाठीं लीला म्हणूनच त्यांनीं रोग धारण केला होता !" यानंतर आमरण ते या बागेच्या रस्त्यानें कधीं आले नाहींत. आम्ही दक्षिणेश्वर येथें येऊन पोहोंचलो नागमहाशयांनीं फाटकापाशीं येतांच साष्टांग नमस्कार घातला. मीं ( लेखक ) दक्षिणेश्वर पूर्वी कधीं पाहिलें नसल्यामुळें, सुरेशनें मला श्रीरामकृष्णांचें साधनस्थळ, बिल्वमूल, पंचवटी वगैरे स्थानें एकामागून एक दाखविलीं. नागमहाशय यंत्राप्रमाणें आमच्याबरोबर चालत होते. त्यांचें मन कुठें होतें, हें सांगणें कठीण. शेवटीं आम्ही, श्रीरामकृष्ण रहात त्या ठिकाणी येऊन पोहोंचलो. घराजवळ येतांच नागमहाशय " हा श्रीरामकृष्ण ! काय पहावयाला मी येथें आलों " असें म्हणून मूर्छित होऊन पडले ! आम्ही त्यांना धरून उभें केलें, पण कोणत्याही प्रकारें त्यांना घरांत घेऊन जाऊं शकलों नाहीं ! नागमहाशय म्हणाले " आतां आंत येऊन काय पाहूं ? या जन्मींचें पहाणें ऐकणें सर्व होऊन गेलें ! " त्यांनीं वरील घरांत प्रवेश केला नाहीं. ज्यावेळीं पुढें कधीं दक्षिणेश्वरीं येत, तेव्हां फक्त दुरून घराला नमस्कार करूनच परत येत. आम्ही गेलों त्या दिवशीं श्रीरामकृष्णांचा भाचा हृदयही त्या दिवशीं दक्षिणेश्वर येथें आला होता, त्याचा चेहरा अगदीं मलीन असून, त्याच्याबरोबर एक कापडाचा गठ्ठा होता. यावेळीं हृदय कापड विकून आपला निर्वाह करीत असे. हृदयची व नागमहाशयांची ओळख होतीच. तेव्हां दोघेही श्रीरामकृष्णांच्या गोष्टी बोलूं लागले. श्रीरामकृष्णांच्या घरासमोर बसून हृदयनें ३-४ जगदंबेचीं पदें म्हटलीं. श्रीरामकृष्ण देखील नेहमीं तींच पदें म्हणत असत. अनेक गोष्टी झाल्या-वर हृदय नागमहाशयास म्हणाला " तुम्ही सर्वजण त्यांच्या कृपेनें कसे होऊन गेलांत, पण मला अजून उदरनिर्वाहाकरितां दारोदार कापड विकत हिंडावें लागतें ! मामांनीं माझ्यावर कृपा केली नाहीं !" म्हणून हृदय एखाद्या लहान मुलाप्रमाणें रडूं लागला. असो,

दक्षिणेश्वर येथून परत येतांना, आम्हीं आलम बाजारांतील मठात गेलो, व तेथे श्रीरामकृष्णाचा सायकाळचा प्रसाद घेतला स्वामी रामकृष्णानद आमच्याबरोबर श्रीरामकृष्ण कथा करीत करीत बरेच लाब आले. रामकृष्णानदाची परवानगी घेऊन मी ( लेखक ) गिरिशकडे गेलो व नागमहाशय आपल्या घरीं परत गेले. श्रीरामकृष्णभक्तजननीचे ( श्रीरामकृष्णपत्नी ) त्या वेळेला बेलूड येथे गगातीरी असलेल्या नीलांबर बाबूच्या बागेत वास्तव्य असे. एक दिवस मी व नागमहाशयानी दर्शनास जाण्याचे ठरविले. कुमारटुलीच्या घरात जाऊन पाहिले तो नागमहाशय रामकृष्णभक्तजननीकरिता मिठाई व काहीं कापड आणावयास जाण्याचे तयारीत होते, व मध्ये मध्ये लहान मुलाप्रमाणे " आई ! आई ! " म्हणत होते. सर्व सामान आणून झाल्यावर आम्ही कुमारटुलीहून आहिरी टोला येथे जाऊन एक नौका गाठली, व लौकरच बेलूड येथे पोहोचलो. घाटावर पोहोचताच नागमहाशय एखाद्या केळीच्या पानाप्रमाणे कापू लागले. " जय आई ! जय आई !" म्हणता म्हणता त्याचे शरीर थरथर कापू लागून ते पडण्याच्या बेतात आले. स्वामी प्रेमानद यानी नागमहाशयास लाबून पाहिले व त्याप्रमाणे (रामकृष्णभक्त जननी ) माताजीकडे निरोप पाठविला. स्वामी प्रेमानद नागमहाशयाचा हात धरून त्याना माताजीकडे घेऊन गेले, व मी घाटावरच बसलो. नागमहाशय सुमारे अर्ध्या तासाने माताजीकडून बाहेर आले, तरीही भावावेशात म्हणत होते "बापापेक्षा आई मायाळु ! बापापेक्षा आई मायाळु !" त्याची ती स्थिति पाहून स्वामी प्रेमानद म्हणाले "अहाहा ! आज माताजीनी नागमहाशयावर केवढी कृपा केली ! नागमहाशयानी आणलेली मिठाई स्वहस्ते घेऊन खाऊन, स्वतः हाताने नागमहाशयास प्रसाद दिला व नतर पाणी दिले !" थोड्या वेळाने मी व नागमहाशयानी स्वामी प्रेमानदाची परवानगी घेतली. त्या दिवशीं माताजीचे दर्शन माझ्या नशिबात नव्हते.

देशात जाण्याच्या ४-५ दिवस पूर्वीं, नागमहाशय मला घेऊन आणखी एक दिवस आलम बाजार मठात गेले. जाण्याच्या पूर्वीं मी

त्याच्या कुमारटुली येथील घरी गेलो, तों अकरा वाजून गेले होते; तरी त्याचे जेवण झाले नव्हते. तथापि ते तसेच माझ्याबरोबर निघाले. अवश्य ते खाद्यद्रव्य बरोबर घेऊन आम्ही ११॥ वाजण्याच्या सुमारास मठात येऊन पोहोचलो. त्यावेळी सन्यासी गणाचे भोजन झाले होते व ते विश्राती घेत पडले होते. श्रीरामकृष्णाची शेजारतीही झाली होती. नागमहाशयाचे अजून जेवण झाले नाही, हे कळताच स्वामी प्रेमानद व रामकृष्णानद यानी ताबडतोब उठून त्याच्याकरिता खाण्याचे तयार केले. श्रीरामकृष्णदेवाला शयनातून उठवून त्याना भोग चढविला. नागमहाशयानी पुष्कळ प्रकारे " असे करू नका " म्हणून सागितले पण कोणीही ऐकिले नाही. नागमहाशयास प्रसाद देताच " जयराम-कृष्ण ! " म्हणून ते नृत्य करू लागले. नतर आम्ही प्रसाद गृहण केला. मोठमोठ्या राजेरजवाड्याच्यासाठी सुद्धा श्रीरामकृष्णदेवाच्या नित्य पूजापरिपाठात तिळभरही व्यतिक्रम होऊ न देणाऱ्या रामकृष्णानदानी आज नागमहाशयासाठी आपल्या नियमाचे ( श्रीरामकृष्ण देवाना शय-नातून भलत्याच वेळी न उठविण्याचे ) उल्लघन केले !

श्रीरामकृष्णभक्तजननीने नागमहाशयाना एक वस्त्र दिले होते. नेहमी तेच वस्त्र डोक्याला बाधून नागमहाशय पूजेचा बाजार आणाव-यास जात. कोणा एका भक्ताच्या सागण्यावरून नागमहाशयानी जगद-बेच्या पूजेच्या वेळी वारण्याकरिता चादीच्या मुठीचे एक पाढरे चामर विकत घेतले. पालबाबूच्या व्यवस्थेने ठेक्याच्या धद्यात जे काहीं नागम-महाशयास मिळे, त्यातूनच वार्षिक पूजेचा बाजार होत असे. वार्षिक पूजेचा बाजार करणे झाल्यावर ते रेलवेने गावी जाण्यास निघाले. त्याना पोचविण्यास एक भक्त स्टेशनवर आला होता. नागमहाशयाचे सर्व सामान गाडीत ठेवण्यापूर्वी, त्या भक्ताने आपली छत्री आधी गाडीत ठेविली होती. जावयाचे वेळी गडबडीत तो गाडीतच छत्री विसरला. नागमहाशयानी भक्ताची छत्री राहिली असें पाहून नीट जपून ठेविली. परतु एका गृहस्थाने ती माझी आहे म्हणून छत्री उचलून घेतली. नागम-हाशयानी त्याला नाना प्रकारे समजाविले पण काही उपयोग झाला

नाहीं. गाडी चालू असता सदरहु गृहस्थाला झोप लागली. त्या गृहस्थाला ज्या स्टेशनवर उतरावयाचे होते ते निघून गेले, तरी त्याची झोप सपली नाहीं. तीनचार स्टेशने पुढे गेल्यावर त्याची झोप मोडली, व जवळ पुरेसे पैसे नसल्यामुळे जादा पैशाबद्दल स्टेशन मास्तरने त्याला अटक केली. वरील गोष्टीचा उल्लेख करून नागमहाशय म्हणत " खोट्या कर्मांचे फळ हातोहात मिळते, तरीसुद्धा माणसाला शुद्ध येत नाही." त्याच गाडींत एक गृहस्थ एका वारवनितेला घेऊन प्रवास करीत होता. नागमहाशय म्हणत " मला दिसले कीं एक डाकिणी त्या गृहस्थाच्या नरडीचा घोट घेत आहे ! पहाता पहाता त्या गृहस्थाचे मास सपून फक्त हाडामासाचा सापळा राहिला, हे पहाताच मी चमकून "आई ! आई ! " ओरडलो ! वरील प्रकार मी या डोळ्यानी प्रत्यक्ष पाहिला !" या वर्षी पूजा सपताच नागमहाशय कलकत्त्यास आले.

कलकत्त्यास आल्यावर ते कधी आलमबाजार मठ, दक्षिणेश्वर, गिरीश बाबू इकडे जात असत व जाताना सुरेशला व मलाही बरोबर नेत. कुमारटुली येथील नागमहाशयाच्या घरीं पुष्कळ लोक त्याच्या दर्शनास येत. कोणी त्याचा विशेष सन्मान केल्यास ते अस्थिर होऊन म्हणत "काय या हाडामासाच्या पिजऱ्याला पहावयास आलात ? श्रीरामकृष्णाच्या कथा सागून माझा प्राण शात करा." गिरीश बाबू, मध्ये मध्ये नागमहाशयाना जेवावयास बोलावीत. गिरीश बाबूचे अन्न मोठ्या आदराने ते ग्रहण करीत, व म्हणत " गिरीश बाबूनीं दिलेले अन्न मी खाल्ले म्हणजे माझे शरीर व मन शुद्ध होईल !" श्रीरामकृष्णाच्या कोणाही भक्ताकडे नागमहाशय अन्न ग्रहण करीत. श्रीरामकृष्णभक्ताच्या बाबतींत ते जातीविचार वगैरे नियम पाळीत नसत. उलट म्हणत "हा भक्त समागम म्हणजे पुरुषोत्तम क्षेत्रांतील अन्नछत्रासारखा आहे."

एक दिवस गिरीश बाबूच्या घरचे नागमहाशय याना आमत्रण होते. त्या दिवशीं देवाला खिचडीचा नैवेद्य होता. नागमहाशय जेवावयास उठले, तों त्याना दिसले कीं आपल्यासाठीं एका पानावर खिचडी व एकावर तोंडी लावण्याचे पदार्थ वाढले आहेत. निराळ्या पानावर वाढलेले

तोडी लावण्याचे पदार्थ पाहून नागमहाशय हात जोडून म्हणाले " यानीं सुखाची इच्छा होईल! यानी सुखाची इच्छा होईल!" असे म्हणून थोडे थोडे पदार्थ आपल्या पानावर घेऊन त्यानी ते दुसरे पान बाजूला सारून ठेविले, व नतर ते गिरीश बाबूबरोबर जेवावयास बसले. त्याच्या पानावर मीठ वाढावयास आले असता ते न घेता ते म्हणाले, " नको, उगाच जिव्हेला स्वादाची जाणीव होईल!"

असेच आणखी एक दिवस त्याना गिरीशबाबूकडे निमत्रण होते. त्या दिवशीं गिरीशला एक चागला कई जातीचा मासा सापडला होता. तो नागमहाशयास खाऊ घालण्याची त्याची इच्छा होती, व त्याचाच ते विचार करीत असता नागमहाशय म्हणाले " आम्हाला प्रसाद द्या " भगवान् श्रीरामकृष्णभक्ताचा प्रसाद नागमहाशय परम आदराने व भक्तीने मागून घेत, पण सहसा कोणीही या महापुरुषास आपल्या पानातले पदार्थ द्यावयास धजत नसत, पण गिरीशनी ही सधी वाया न दवडिता " जयरामकृष्ण! हा प्रसाद घ्या." म्हणून आपल्या पानावरचा तो मासा उचलून नागमहाशयाच्या पानावर ठेविला. नागमहाशय खात खात म्हणाले " वा! छान! छान!"

थडीच्या दिवसात नागमहाशयाच्या अगावर गरम कपडा नसल्यामुळे त्याना फार कष्ट होतात, असे ऐकून गिरीश बाबूनीं श्रीयुत देवेद्रनाथ मुजुमदार याच्याबरोबर एक कांबळी त्याना पाठवून दिली. गिरीशबाबूनी ही कांबळ पाठविली आहे, हे ऐकून कांबळीला वारवार नमस्कार करून त्यानीं ती आपल्या डोक्याला बाधली! नागमहाशय कोणाचीही वस्तू ग्रहण करीत नाहीत हे गिरीशला माहीत होते. त्यानी कांबळ घेतली हे देवेद्रनाथच्या मुखाने ऐकून गिरीशला फार सतोष झाला. परतु काही दिवसानतर त्यानी ऐकिले की, नागमहाशय ती कांबळ अगावर न घेता, नेहमी डोक्यावरच ठेवितात, तेव्हा त्यानीं देवेद्रास पुन्हा पाहून येण्यास पाठविले देवेद्र बाबूनी परत येऊन सांगितले कीं " नागमहाशय खरोखरच कांबळ डोक्यावर धारण करून बसले आहेत!" कलकत्त्यास २–३ महिने वास केल्यानतर नागमहाशय परत देशीं गेले. दीनदयाळची प्रकृती दिवसे-

दिवस खालावत चालल्यामुळे, ते पहिल्यासारखे कलकत्त्यास वारवार येत नसत. स्वामी विवेकानद अमेरिकेहून पहिल्याने परत आल्यावर लेखक त्याच्या भेटीला गेला. " मी नागमहाशयाकडे जात येत असतो," हे ऐकून स्वामी मला म्हणाले " वय तत्वान्वेषात् हता, मधुकर (नागमहाशय ) त्व खलु कृती " तत्वान्वेषण करता करता आमचे जिणे व्यर्थ झाले. आमच्यामध्ये नागमहाशयच श्रीरामकृष्णाचे खरे खरे शिष्य झाले." नतर स्वामीजीनी नागमहाशयाच्या गावीं जाऊन त्याना भेटण्याची इच्छा प्रदर्शित केली, व त्याप्रमाणे मला नागमहाशयास पत्र लिहिण्यासही सागितले.

स्वामी परत देशी आले, हे वर्तमान नागमहाशयास कळताच त्याच्या भेटीकरिता ते कलकत्त्यास आले. त्यावेळी बेलूड मठ स्थापन झाला असून स्वामी तेथेच रहात असत दुपारी नागमहाशय व मी मठात जाऊन पोंहचलो, व स्वामींना आम्हीं साष्टाग प्रणिपात केला. स्वामींची प्रकृती चागली नाही असे पाहून, नागमहाशय म्हणाले " श्रीरामकृष्ण म्हणत, आपण मोहरेची पेटी आहा, आपल्याकडून जीवाचा उद्धार व जगाचे कल्याण होईल," तेव्हा आपण प्रकृतीस नीट जपले पाहिजे. वगैरे अनेक कथा वार्ता झाल्यावर स्वामीनी नागमहाशयास मठातच राहण्यास सागितले, तेव्हा ते म्हणाले, " काय करू ? श्रीरामकृष्णानीं घरीच रहा म्हणून मला आज्ञा केली आहे, ती कशी उल्लघन करू ? "

नागमहाशयाच्या आगमनामुळे त्या दिवशी सन्यासी ब्रह्मचारी याचे पठण बद ठेवण्यात आले होते. त्यामुळे सर्वजण स्वामीना व नागमहाशयाना घेरून बसले. स्वामींच्या मुखातून श्रीराकृष्णनाम निघताच नागमहाशय उठून उभे राहिले, व मोठ्याने "जयरामकृष्ण ! जयरामकृष्ण !" म्हणता म्हणता म्हणाले, "मी त्या दिवशीं दक्षिणेश्वर येथे जाऊन पाहिले तो तेथें श्रीरामकृष्ण नाहीत, श्रीरामकृष्ण येथे मठात येऊन राहिले आहेत ! " स्वामींनी "मठमदीर स्थापन केले हे ठीक झाले की नाही," असा प्रश्न करताच नागमहाशय म्हणाले " श्रीरामकृष्णाच्या इच्छेने सर्व ठीक होत आहे. याने जीवाचें व जगाचे कल्याण होईल, आपण आपल्या शरीराची

नीट काळजी घ्या, आपल्या हातून जगाचे कल्याण होईल ! " उपस्थित भक्त मडळीला व सन्यासी गणाला स्वामी म्हणाले, " ईश्वराच्या कृपेने मानवाची ही अशी अवस्था होऊ शकते, हे फक्त नागमहाशयाना पाहूनच समजू शकते. नागमहाशय त्याग व इद्रियदमन यात माझ्यापेक्षाही श्रेष्ठ आहेत. " काही वेळानतर नागमहाशयास श्रीरामकृष्ण मदिरात नेण्यात आले नागमहाशयानी " श्रीमन्दीर ! श्रीमन्दीर !" म्हणून द्वारा-समोर नमस्कार घातला स्वामी विवेकानद सकाळ सध्याकाळ मठाच्या आवारात फिरत असत. आज त्याप्रमाणे फिरत असता नागमहाशयही त्याच्याबरोबर हिडू लागले. नागमहाशय रात्री मटात रहाणार नाहीत हें ऐकून स्वामी म्हणाले, " सध्याकाळ होत आली, एकादी नौका पहा जा " नागमहाशयानी जाण्याच्या वेळी " जय शिव शकर ! जय शिव शकर !" म्हणून स्वामीस प्रणाम केला, तेव्हा स्वामीनी त्याचा हात धरून उठविले व म्हणाले, " कधी कधी येऊन आम्हाला दर्शन देऊन कृतार्थ करीत जा " स्वामी विवेकानदाचे नाव निघताच नागमहाशय नेहमी " जय शिव शकर !" म्हणून त्याना उद्देशून नमस्कार करीत. पाश्चात्य भूमीत त्यानी केलेला धर्मप्रचार व दिग्विजय यावर बोलणे निघाले असता नागमहाशय "महावीर ! महावीर !" म्हणून सिहा-प्रमाणे गर्जना करीत ! बागबाजार येथील श्रीयुत बलराम बसूचे घर श्रीराम-कृष्णाचे अत्यत प्रिय स्थल असे. त्या स्थलाला नागमहाशय " प्रभूचे लीलाक्षेत्र " म्हणत. श्रीरामकृष्णाचे सन्यासी भक्त कलकत्ता येथे आले असता प्रायः बरील गृहींच रहात व नागमहाशय तेथे जाऊन त्याचे दर्शन घेत एक दिवस मी त्याच्याबरोबर तेथे गेलो, त्या दिवशी स्वामी ब्रह्मा-नद व प्रेमानद हे तेथे होते. त्याच्या आपसात काही गोष्टी चालल्या होत्या. नागमहाशयास पहाताच त्या बद होऊन केवळ श्रीरामकृष्णकथा चालू लागल्या. आम्ही परत फिरण्यापूर्वी स्वामी ब्रह्मानद म्हणाले "नाग-महाशय येताच सर्व कथा बद होऊन आम्हाला एकदम श्रीरामकृष्णकथा आठवल्या ! असल्या महापुरुषाच्या जन्मामुळेच भारतवर्षात धर्म कर्म अजून जागृत आहे. धन्य नागमहाशय ! " श्रीरामकृष्ण भक्तगणासबधी

नागमहाशय म्हणत " हे सर्व मनुष्याचा देह घेऊन श्रीरामकृष्णाबरोबर लीला करण्याकरिता अवतरलेले देव आहेत, याना कोण ओळखणार ? कोण ओळखू शकणार ? " असो.

दिवसेदिवस नागमहाशयाच्या वडिलाची आयुर्मर्यादा सपण्याची वेळ जवळ येत चालली. दीनदयाळ नित्य सध्या, पूजा व तुळशीची माळ घेऊन जप ध्यान यातच मग्न राहू लागले. त्याची ससारासक्ति अगदी उडाली होती. त्याचे शरीरही व्याधीहीन होते. एक दिवस प्रातःकाळी नागमहाशय त्याचा हात धरून त्याना बाहेरून घरात आणीत असता दीनदयाळ रस्त्यात एकदम कमर खचून खाली पडले, नागमहाशयानीं पित्याला पाठीवर घेऊन घरी आणिले, आणता आणताच दीनदयाळ सज्ञाहीन झाले होते. घरी आणताच दीनदयाळ शुद्धीवर आले खरे, पण नागमहाशयास कळून चुकले की, पित्याचा अतकाल जवळ आला आहे. डॉक्टर आणण्याकरिता नागमहाशयानी एकाला पाठविले, व स्वतः ईश्वराचे नाव घेऊ लागले. तेव्हा आसन्नमरण दीनदयाळही हरिनामस्मरण करू लागला. डॉक्टर आले त्यानी नाडी पाहून सागितले की " अवस्था कठीण दिसते, वृद्धाची वेळ जवळ येऊन ठेपली आहे." डॉक्टर गेल्यावर काहीं तासानी दीनदयाळने इष्ट देवतेचे नामस्मरण करीत देवलोकी गमन केले. त्याचे वय तेव्हा सुमारे ८० वर्षांचे होते. पितृवियोगाने नागमशय दुःखित झाले नाहीत, तर उलट " चागले शुद्धीवर असता त्याचे देहावसान झाले," म्हणून त्याना आनदच वाटला. पित्याच्या मरणानतर त्यानीं यथारीति क्रियाकर्म वगैरे सपविले. आपल्या आयुष्यातील हेच शेवटचे कार्य, म्हणून नागमहाशयाच्या मनात वडिलाची क्रिया मोठ्या थाटाने करावयाची होती, पण जवळ पैसे नसल्यामुळे त्याना तसे करिता आले नाही.

नागमहाशयाच्या मदतीकरिता नारायणगज येथील रॅली ब्रदर्सच्या ऑफीसातील मडळी वर्गणी करू लागली. हे नागमहाशयास कळताच त्यानीं निरोप पाठवून त्याना त्या कामापासून परावृत्त केले. व गावातीलच एका सावकाराकडे आपले घर गहाण ठेऊन त्यानीं ५०० रुपये

कर्ज काढलें. त्यांच्या शेजारचे चौधरी बाबू याच्या वृद्ध पत्नीनेही नागमहाशयाच्या पत्नीला श्राद्धाकरिता म्हणून कांही कर्ज दिले होते. एकदर श्राद्धाचा खर्च १२०० रुपये झाला. पुढे पित्याचे वर्षश्राद्ध आटोपून नागमहाशय गयेस गेले, तेथे मुडण वगैरे करून ३ दिवस यथाविधी पिडदान करून नतर कलकत्त्यास आले कलकत्त्यास आल्यावर नागमहाशय सुरेशला म्हणाले, " शेवटचे दिवस बाबानीं सर्व विषयचिंता, वासना याचा त्याग करून ईश्वरस्मरणात घालविले, व शुद्धीवर असता ईश्वराचे नामस्मरण करीत त्यानीं देहत्याग केला. "

पाल बाबूनीं ऐकिले कीं पितृकार्याकरिता नागमहाशयास कर्ज झाले आहे, म्हणून त्यानी नागमहाशयास २०० रुपये मदत देऊ केली, व कुमारटुलीतील घराचे भाडे वाढवून नवीन बिऱ्हाड ठेवावें अशी सल्ला दिली. रणजितचेही मत याप्रमाणेच होते, पण नागमहाशयानीं यातील कोणतीच गोष्ट कबूल केली नाही. नागमहाशयाचा उदारपणा पाहून, त्याच्या घरात राहणाऱ्या कीर्तीवासाने आपखुषीने जास्त भाडे देण्याची इच्छा दर्शविली. तेव्हा नागमहाशय म्हणाले " आपण रात्रदिवस कष्ट करिता, तरी आपली मिळकत बेताचीच आहे, आपण देता हेच भाडे आपल्याला जास्त आहे. मी जास्त भाडे घेऊ इच्छित नाहीं." नागमहाशयाचे कीर्तीवासावर पुत्रवत प्रेम होते, व कीर्तीवासही ते कलकत्त्यास आले असता त्याची मोठ्या श्रद्धेने सेवा करीत असे. कीर्तीवास अजूनही त्याच घरात रहात आहे व त्याने नागमहाशयाचे रहाते घर व त्याचा मोडका तक्तपोश मोठया काळजीनें नीट राखून ठेविला आहे नागमहाशयाची पत्नी कलकत्त्यास आली असता त्याच घरी रहात असे.

नागमहाशय कलकत्त्यास आले, त्या सुमारास श्रीरामकृष्णभक्तजननी बागबाजार येथे आली होती. नागमहाशय वस्त्र व मिष्ठान्न घेऊन एक दिवस दर्शनास निघाले. रस्त्यातच त्याच्या पोटात वेदना होऊ लागल्या. पुढे जाणे अशक्य झाल्यामुळे ते एका घराच्या ओसरीवर बराच वेळ अचेतन होऊन पडून राहिले. भाड्याची गाडी करून ते घरीं येऊ शकले असते व त्याच्याजवळ पैसेही होते. पण माताजीकरिता जे सामान

आणिले ते त्याना अर्पण न करिता परत घरी कसे जावयाचे ? पडल्या पडल्याच "हाय! हाय!" म्हणून ते आक्रोश करू लागले. सरासरी दोन तासानी त्याच्या वेदना थाबल्या, तेव्हा माताजीचे दर्शन घेऊन रात्री ९ वाजता घरी परत आले. आदल्या दिवशीही असाच वेदनाचा त्रास त्याना भोगावा लागला होता. कलकत्त्यास त्याच वर्षी प्रथमच प्लेगची साथ आली. श्रीमत गरीब सर्वजण शहर सोडून गेले. शहर अगदी निर्मनुष्य झाले होते. पालबाबूनी आपल्या घराच्या देखरेखीचा भार नाग-महाशयावर सोपवून स्वदेशी गमन केले. त्याच्या घरात फक्त एक स्वयपाकी, एक ब्राह्मण कारकून व एक चाकर इतकीच माणसे राहिली. आम्ही एक दिवस नागमहाशयाना भेटावयास म्हणून गेलों, तो नागमहा शय चष्मा लावून गीतापाठ करीत पालबाबूच्या घरीं बसलेले दिसले आम्हाला तेथे पहाताच ते म्हणाले, " मला गीतेंतले काय समजते ? आपण ब्राह्मण पडित लोक, हा सर्व आपला अधिकार आहे. मी भाबडा मनुष्य, मला यातील काही ऐकवा!" तेव्हा गीतेतला "कर्मण्य-कर्म यः पश्येत् " या श्लोकाचा ५–६ प्रकारचा अर्थ मीं त्याना ऐक-विला. सगळ्या प्रकारचे अर्थ ऐकून त्यानी श्रीधर स्वामीच्या टीकेचीच सर्वापेक्षा विशेष प्रशसा केली. असो. त्यानतर ३ दिवसानी ब्राह्मण कारकून प्लेगने आजारी पडला. तपासणीकरिता एक डॉक्टर आला, पण त्याची सेवा शुश्रूषा कोण करणार ? प्लेगच्या रोग्याला कोणी हातही लावीत नसत. एकटे नागमहाशय रोग्याला औषध व पथ्यपाणी देत आहेत, अशा वेळी आम्ही तेथे जाऊन पोहोचलो, तेव्हा ते म्हणाले " आणखी ५–७ दिवस तुम्ही येथे येणे बद करा." मी म्हणालो " आपण येथे राहिला आहात, मग आम्हाला काय भय ?" नागमहाशय म्हणाले " जनसमजुतीप्रमाणे चालले पाहिजे. सासर्गिक रोग म्हणून काहीं दिवस न येणे चागले."

वरील दिवशीच कारकून मृत झाला. मरणापूर्वी गगेवर जाण्याचा त्याने फार हट्ट घेतला. कोणी मदतीस नसल्यामुळे एकट्या नागमहाशयानीच त्याला धरून जवळ असलेल्या गगाघाटावर नेलें. तेथें नेताच " गगा

गगा " म्हणत त्या ब्राह्मणाचे नागमहाशयाच्या अगावरच देहावसान झाले. नागमहाशयानी पालबाबूच्या घरच्या चाकराला प्रेताजवळ ठेऊन, स्वतः त्याच्या अत्यविधीकरिता काहीं ब्राह्मण मडळीस बोलावण्यास गेले. प्लेगने मृत्यु झालेला, कोणीही अंत्य विधीकरिता येईना. शेवटी मोठ्या कष्टाने दर माणशी चार रुपये देण्याचे कबूल करून त्यानी ४–५ जण ब्राह्मण मिळविले, व त्याचा अत्य विधि उरकला. या सत्कार्यांत नागमहाशयाना एकदर २५ रुपये खर्च आला. वरील प्रसगीच नागमहाशयाच्या दर्शनास बाबू सुरेंद्रनाथ सेन, आशुतोष चौधरी, व नरेंद्रनाथ बसू आले होते. नागमहाशयाचा सर्व व्यवहार पाहून सुरेंद्रनाथ सेन व अशुतोष चौधरी याना मोठा विस्मय वाटला, फक्त नरेंद्रनाथ बसूच म्हणाले की " हा निव्वळ पागल आहे " असो. एकदा नागमहाशय काली घाटावर गेले व परत येताना, त्याना एका पटागणात एक भक्त भेटला. सदरहु भक्ताने नागमहाशयास कलकत्ता येथील प्रख्यात (एडन गार्डन ) बाग पाहावयास नेले. बाग पाहाताच नागमहाशय एकाद्या लहान बालकाप्रमाणे आनदीत होऊन " हे काय ? ते काय ? " अशी पृच्छा करू लागले व परत घरी यावयाचे वेळी म्हणाले "मनुष्य केवळ भोगाच्या पाठीमागे धावत आहे. मानव देह प्राप्त झाला आहे, तरी जन्म मृत्यूचे रहस्य जाणण्याची व त्यातून सुटण्याची काहीं खटपट करावी, ते कोणीकडेच राहिले, उलट, क्षणिक सुख देणाऱ्या विषयाने धुद झाल्यामुळे सर्वाना आत्मविस्मृति झाली आहे, पण हे कोणाच्या लक्षात येत नाही, की येथून एक दिवस सर्व सोडून चालते व्हावे लागेल. या ससारात केवळ राजसिक व तामसिक गुणाचेच प्राबल्य, निव्वळ धावपळ. केवळ कामिनी काचनाचे राज्य, हेच सर्व दिसून येते. हाय श्रीरामकृष्ण ! तुमची किती विचित्र लीला ! "

काहीं दिवसानतर नागमहाशय एक दिवस गिरीशबाबूकडे गेले. श्रीरामकृष्णाच्या लीलाचे वर्णन चालता चालता, स्वामी निरजनानद नागमहाशयास म्हणाले, " भगवान् श्रीरामकृष्ण म्हणत असत की, " जो मनुष्य स्वतःला हीन दीन समजतो तो तसाच होऊन जातो." आपण का

बरे स्वतःला हीन दीन लेखता ? " नागमहाशय म्हणाले " मला जर मी हीन, दीन, अधम, अज्ञ, जीव आहे असे स्पष्ट दिसत आहे, तर मग कसे बरे स्वतःला शिव म्हणू ? आपण स्वतःला शिव म्हणू शकता, गिरीशबाबू म्हणू शकतात, आपण श्रीरामकृष्णभक्त, मला आपल्याप्रमाणे भक्तिलाभ झाला नाहीं आपली व श्रीरामकृष्णाची कृपा झाल्यास मी धन्य होईन." सदरहु उत्तर त्यानी इतक्या लीनतेने दिले की निरजनानद स्वामींस पुढे बोलण्यास जागाच राहिली नाही. वरील बाबतींत गिरीश बाबू म्हणत " ठीक ठीक लीनता अगीं आली की अह बुद्धीचा उच्छेद करिता येतो, मग माणसाची हुबेहुब नागमहाशयासारखी स्थिति होते, अशा सर्व महापुरुषाच्या पादस्पर्शानेच पृथ्वी पवित्र होते, धन्य होते. "

वरील दिवशीच नागमहाशय घरी परत आले असता पुष्कळ सद्गृहस्थ त्याच्या भेटीस आले. आलेल्या गृहस्थानी त्याच्या भक्ति भावाची प्रशसा करिताच ते म्हणाले, " मी पापाचा पुतळा ! कीटकाचा कीटक ! " हे स्वतःसबधीचे उद्गार काढताच, त्याना एकदम स्वामी निरजनानदाचे शब्द आठवले. तेव्हा जमलेल्या सर्व गृहस्थास ते म्हणाले, " आजच मी गिरीशाच्या घरून ऐकून आलो की जो मनुष्य स्वतःला कीटक कीटक म्हणून समजतो, तो कीटकच होतो, व जो स्वतःला शिव समजतो त्याला शिवप्राप्ती होते. आता या क्षणी मी काय करू ?" थोडा वेळ विचार करून म्हणाले, " खऱ्या गोष्टीला दोष नाही, मी तर वास्तविकच कीटक आहे. कीटकाला कीटक म्हणण्यात काही दोष नाहीं. खऱ्या गोष्टीला काय हरकत ? श्रीरामकृष्णाची कृपा असली, आपणा सर्वांची कृपा असली व गिरीशबाबूची कृपा असली, म्हणजे मी सत्य सोडून कधींही असत्य मार्गाने चालणार नाही." असें म्हणून त्यानीं सर्वांस नमस्कार केला, व श्रीरामकृष्णाना व गिरीशला उद्देशून वारंवार नमस्कार करू लागले. थोडा वेळ डोळे मिटून स्तब्ध राहिले, व पुन्हा म्हणाले, "या हाडामांसाच्या पिंजऱ्याच्या ठिकाणीं शिव म्हणून कसा अभिमान धारण करू ?" गिरीश बाबू साक्षात भैरव. ते खरोखरच शिव !" असे म्हणून पुन्हा त्याना उद्देशून

प्रणाम करू लागले. नतर बसलेल्या सद्गृहस्थाकरिता चिलिम तयार करिता करिता म्हणाले, "मी आणखी काय करू ? मी आपल्याला चिलीम तयार करून ओढावयास देतों, झाले "

नागमहाशय देशात परत जाण्यापूर्वी रामकृष्णपूर येथील श्रीयुत नवगोपाल घोष याचे घरीं एक दिवस श्रीरामकृष्ण उत्सव झाला. "वसुमती पत्रिकेचे एडिटर श्रीयुत उपेंद्रनाथ मुखोपाध्याय यानीं नागमहाशयाना तेथे चलण्याबद्दल विनती केली, व मीही त्याला दुजोरा दिला. उत्सवाच्या दिवशी सकाळीं नागमहाशय व मी अहिरी टोल्यात उपेंद्रबाबूंच्या घरी जाउन पोहोचलों व निडन स्ट्रीटच्या वळणाने येऊन एक भाड्याची गाडी ठरविली नागमहाशय म्हणाले, "आपण गाडीने जा, मी मागून चालत चालत येतो." उपेंद्र बाबूंना माहीत होतें की, घोड्याला चाबूक मारला असता नागमहाशयाना फार दुःख होईल, म्हणून त्यानीं गाडीवानाला घोड्याला न मारण्याबद्दल बजाविले नतर अनेक प्रकारें समजाविल्यावर नागमहाशय गाडींत बसले गाडी नवगोपाल बाबूंच्या घरीं पोहोचली नवगोपाल बाबूंच्या दृष्टीस नागमहाशय पडताच ते "जयरामकृष्ण ! जयरामकृष्ण !" म्हणून गर्जना करू लागले नागमहाशयानी नवगोपाल बाबूंना साष्टांग नमस्कार केला घरात प्रवेश करताच नागमहाशय एका कोपऱ्यात उभे राहून जमलेल्या मडळीला वारा घालू लागले नवगोपाल बाबू व इतर गृहस्थ या सर्वांनी त्याना या कामापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण काही उपयोग झाला नाहीं. श्रीरामकृष्णाच्या अखड नामस्मरणाने रामकृष्णपूर त्या दिवशीं गर्जत होते उत्सवाच्या आनदानें व सकीर्तनाच्या भरात भक्तगण तन्मय होऊन गेले होते परतु नागमहाशयाना आज जमलेल्या मडळीच्या सेवेशिवाय दुसरे कार्यच नव्हते. स्थिरपणे उभे राहून ते एकसारखे मडळीस वारा घालीत होते जणू काय सेवा करण्याकरिताच ते जन्मले आहेत असा भास होत होता. सकीर्तनानतर सर्व भक्तगण जेव्हां प्रसाद ग्रहण करण्यास बसले, तव्हां त्याच्या मागे हात जोडून नागमहाशय उभे राहिले. सगळ्याच्या आग्रहास्तव त्यानीं थोडासा प्रसाद मात्र ग्रहण केला. इतर मडळींबरोबर मुळीच बसले नाहींत. तेव्हा सर्वजण

आश्चर्यचकित मुद्रेने त्याच्याकडे पाहू लागले. उत्सव सपल्यावर परत कलकत्त्यास येतांना टांग्यात बसण्याबद्दल सर्वांनी त्याच्या पुष्कळ विनवण्या केल्या, पण त्यांनी कोणाचेही ऐकिले नाही. अथातच आम्ही सर्वजण चालत घरी आलो रस्त्याने येताना नागमहाशय म्हणाले, " नवगोपालच्या पत्नीस श्रीरामकृष्ण देव " विद्यादेवीच्या अशाने इने जन्म घेतला आहे, " असे म्हणत तिच्या हातचे अन्न श्रीरामकृष्ण खात असत तिला जो मानव समजतो तो खरोखर पशु होय ! "

काहीं दिवसानतर नागमहाशय देशात गेले. यानतर ते पुन्हा कधीही कलकत्त्यास आले नाहीत भगवान श्रीरामकृष्ण ब्रह्मलीन झाल्यावर नाग महाशय जेव्हा प्रथम देशात गेले, तेव्हा त्याच्या मनात वनात एक कुटी करून रहावे असे आले त्याच्या पत्नीस हे समजताच ती म्हणाली "मी कोणत्याही दिवशी आपल्या नित्य क्रमात विघ्न आणले नाही, व आणणारही नाहीं, मग दुसरीकडे रहाण्याचे काय प्रयोजन ?" साध्वी सहधर्मिणीचें हे वचन ऐकून नागमहाशय निश्चित होऊन ससारात राहू लागले. परतु त्यांनीं आजन्म ससारात राहूनही सन्यास धर्माचे पालन केले. त्यांच्या बाबतीत त्याची पत्नी म्हणे. " त्याच्या शरीरावर किवा मनावर कोणत्याही तऱ्हेचे मानवी विकार किवा परिवर्तन दृग्गोचर झाले नाही ते अग्निमध्यें रहात खरे, पण कोणत्याही दिवशी कोणत्याही क्षणी त्याचे शरीर अग्नीने दग्ध झाले नाही. " जयरामकृष्ण !" अशी गर्जना करीत ते जीवभावाच्या मस्तकावर पाय देउन पार झाले होत अत्यत कष्टमय अशा गृहस्थाश्रमात राहूनही ते अलिप्तच राहिले ! "

नागमहाशय एके वेळी आपला भक्त हरप्रसन्न यास म्हणाले "हे बघ, पशुपक्षी यानाही मी जन्मापासून भ्रातृभावाने पहात आलों आहे. "

नागमहाशयाच्या उपाध्याय कुलातील दोघेजण एकदा देवभोग येथे त्यांच्या दर्शनाकरिता आले. या दोघात नवीनचद्र भट्टाचार्य हा साधक वर्गातला होता. दीनदयाळने नवीनचद्रास विनती केली की आपण दोन गोष्टी सांगून दुर्गाचरणाचे मन गृहस्थाश्रमाचे अनुसरण करण्यास वळवा. त्याला मुलगा न झाल्यास माझा निर्वंश होईल. दीनदयाळच्या विनती-

प्रमाणे नवीनचद्रानें नागमहाशयाना गृहस्थाश्रमधर्माचे मर्म सागण्यास सुरवात करून प्रजोत्पत्ति करण्यास ओघाने सागितले. त्याचे हे शब्द नागमहाशयाच्या कानावर पडताच ते धाडकन् खाली पडले, व त्याच्या सर्व अगाला चागलेच लागले. तसेच पडल्यापडल्या ते नवीनचद्रास म्हणाले, " आपण आमचे गुरुकुलातील श्रेष्ठ साधक असून मला असा कसा असगत उपदेश करिता ? " असे म्हणून जवळच पडलेले लाकूड घेऊन आपल्या डोक्यावर प्रहार करून घेऊ लागले ! लाकडाच्या आघा-ताने त्याचे कपाळ फुटून त्यातून रक्त वाहू लागले, तेव्हा नवीनचद्राला पश्चात्ताप झाला, व त्यानीं आपले बोलणे परत घेतले नागमहाशयही मग जरा शात झाले, व त्यानीं नवीनचद्राला साष्टाग नमस्कार केला वरील प्रकार घडल्यानतर एक दिवस दीनदयाळ पुत्राचे तीव्र वैराग्य आठवून नागमहाशयास म्हणाले "अरे, अशा रीतीने तुला अन्न वस्त्र कसे मिळणार! तुझा ससार कसा चालेल हरि जाणे." तेव्हा नागमहाशय म्हणाले "बाबा, तुम्ही माझ्या अन्नवस्त्राची बिलकुल चिंता करू नका. वृक्षावर विपुल पानें आहेत तेच माझे अन्न, आजन्म मी स्त्रीला स्पर्शही केला नाहीं, मातृगर्भांबाहेर जसा आलो तसाच अजूनही आहे, मग मला वस्त्राची काय आवश्यकता ? "

दीनदयाळ बरेच वेळा नागमहाशयाचे वैराग्य पाहून त्याची निर्भर्त्सना करीत असे. त्याप्रमाणे दीनदयाळ बोलत असता, एक दिवस बोलणे खूपच रगात आले. शेवटीं वडिलाचे शब्द त्याना सहन न होऊन ते उत्तेजित स्वराने म्हणाले, " मीं कधीही स्त्रीसग केला नाहीं, आणि मला ससाराची गरजही नाहीं. " असे म्हणून ' नाह ! नाह ! ' म्हणत म्हणत वस्त्रपरित्याग करून ते घराबाहेर निघून गेले. तेव्हा त्याच्या पत्नीनें एकच आकात माडला. नागमहाशयाचा एक भक्त श्रीयुत अन्नदा याने त्याच्या पाठीमागें जाऊन त्याना परत घरीं आणले.

देवभोग येथील एक प्रौढ विधवा नागमहाशयाच्या दर्शनास नित्य येत असे व तिची त्याच्यावर फार भक्ति होती. परतु नागमहाश-याच्या तीक्ष्ण दृष्टीसमोर तिचा अतस्थ दुष्ट हेतु गुप्त राहिला नाही. प्रौढ

वयात विधवेच्या मनातील दुर्मती पाहून, नागमहाशय मनातल्या मनात तिची अवज्ञा करीत नागमहाशयाच्या पत्नीला विधवेचा हेतु समजताच तिने तिचे येणे बंद केलें. नागमहाशय वरील बाबतीत एक दिवस म्हणाले " हाय हाय! कावळ्या कुत्र्याला देखील ह्या हाडामासाच्या पिंजऱ्याचे मास आवडणार नाही असे वाटते, परंतु या बाईच्या मनांत या देहाच्या बाबतीत अशी भावना कशी झाली? श्रीरामकृष्ण नानारूपाने माझी परीक्षा घेत आहेत झाले!" असे म्हणून "जयरामकृष्ण! जयरामकृष्ण!" असा घोष करून पुढे म्हणाले, ' मानव देहाला जिव्हा व उपस्थ या दोघाचा जय करणे फार कठीण आहे श्रीरामकृष्ण कृपा झाली तरच त्याना वश करून घेता येते " नागमहाशयाच्या मुखातून निघणाऱ्या लहान गोष्टीतही फार अर्थ भरलेला असे ते नेहमी म्हणत असत कीं " काम सोडला की राम, व रति सोडली कीं सती."

कामिनीप्रमाणेंच कांचनाच्या बाबतीतही नागमहाशयाचे ठिकाणी तीव्र वैराग्य बाणले होते. एकदा नारायणगंज येथील पालबाबूंच्या नात्यातला एक गृहस्थ देवीने आजारी झाला. कोणाच्याही औषधाने त्याला आराम पडेना नागमहाशयाची वैद्यकीय ज्ञानासंबंधीची ख्याति पालबाबूस माहीत होतीच. त्यानी नागमहाशयास बोलावून औषध देण्याची विनंती केली. तेव्हा नागमहाशयाना ती टाळता येईना. रोग्याला तपासून त्यानी एक होमिओपाथिक औषध लिहून दिले, ते पालबाबूंनी मागवून रोग्यास दिले असता रोगी थोड्याच दिवसात पूर्ण रोगमुक्त झाला. पुढे काही दिवसांनी पालबाबूंनीं वरील कामगिरीबद्दल ३०० रुपये बक्षीस त्याच्याकडे पाठवून दिले, पण नागमहाशयानी त्या पैशाला स्पर्शही केला नाही. तेव्हा आलेल्या गृहस्थाने त्याना फारच आग्रह केला, परंतु ते पैसे घेईनात, व कातर स्वरानें ओरडत म्हणाले "हाय श्रीरामकृष्ण! मला का ही हीन चिकित्सक वृत्ति शिकविलीत? त्या वृत्तीनेच तर मला इतके दुःख भोगावे लागत आहे!" वगैरे त्याचे क्रंदन पालबाबूच्या मनुष्यानें ऐकताच त्याचे डोळे पाण्यानें भरून आले व "बाबा, तुम्हीं काहीं सामान्य मनुष्य नाहीं," असें म्हणून त्याने आपला रस्ता धरला.

या अलौकिक महापुरुषाचा सर्व व्यवहारच अलौकिक होता यात संशय नाहीं. एकवेळ पालबाबूच्या निमत्रणावरून ते भोगेश्वर येथे त्यांच्या भेटीकरिता गेले होते. तेथून परत निघण्याचे वेळी कलकत्त्याप-र्यंतचें बोटीचे भाडे ८ रु. व एक कांबळ हे पालबाबूंनीं नागमहाशयास दिले. भोगेश्वरपासून तीन कोसावर हासकादी येथे त्यावेळीं बोटीचे स्टेशन होते. तेथे पोहोचताच नागमहाशय बोटीचे तिकीट घेण्या-करिता चालले असता, मध्येच एक भिकारीण चार लहान मुलें घेऊन आपलें दुःख सागून दीन स्वराने त्याच्याजवळ भिक्षा मागू लागली. तिचा कातर स्वर ऐकून नागमहाशयानी पालबाबूंनीं दिलेले आठ रुपये व कांबळ त्या भिकारणीला देऊन टाकली, व म्हणाले “ आई, हे घेऊन स्वतःचे व आपल्या मुलाबाळाचे रक्षण कर जा. ” त्यानीं दिलेली भिक्षा हातांत पडताच भिकारणीने दोन्ही हात जोडून त्याना आशीर्वाद दिला व मुलासह दुसरीकडे निघून गेली. नागमहाशयानी नतर थोडी विश्राती घेऊन बोटीचा नाद सोडून देऊन, पायींच कलकत्त्याची वाट धरली. रस्त्यांत एकादें देवालय दिसले तर तेथे मिळेल तो प्रसाद खात, नाहीं तर लाह्या फुटाणे घेऊन खाऊन आपला मार्ग धरीत! मोठी नदी किंवा नाला मध्ये लागला तर पार होण्यासाठी नावेस १ २ पैसे खर्च करून पार होत. अरुद नाला असला तर स्वतःच पोहून पार होत ! त्याच्याजवळ निघतांना साडेसात आणे फक्त शिल्लक होती, तीवरच भार ठेऊन पायीं चालत चालत २९ व्या दिवशीं ते कलकत्त्यास येऊन पोहोंचले !!

पूर्वी एकदा बरेच दिवस ठेक्याचे काम बद असल्यामुळे, नागमहाश-याना पैशाची फारच तगी होऊ लागली. कधीं कधीं त्याना उपवासही करावे लागले. पुष्कळ दिवसानतर एक दिवस पालबाबूचे हजार मण मीठ रवाना झालें, व तें मीठ जहाजावरच चढविण्याकरिता ते खिदीर-पूर येथे गेले. हजार मण मिठाचे त्याना ७-८ रुपये उत्पन्न व्हावयाचें पण सारा दिवस उन्हात राहून शेवटीं मोठ्या कष्टानें १३ आण्याचे पैसे मिळाले. परत घरीं येत असता रस्त्याने एका मैदानात एकजणाने, आपले

दुःख त्यांना निवेदन करताच नागमहाशयानीं त्या दिवसाची सारी कमाई ( १३ आणे ) त्याला देऊन टाकून, आपण रिक्तहस्ते घरीं परत आले ! घरात वरील दिवशीं तादूळ देखील शिल्लक नव्हते, तेव्हा अर्थातच त्याना उपवास पडला !

नागमहाशय जेव्हा लहान होते, तेव्हा एकादा कुत्रा किंवा माजर ओरडू लागले तर त्याना वाटे कीं " हीं बिचारीं भुकेनें व्याकूळ होऊन रडतात!" म्हणून त्यानी मोठ्या काकुळतीने भगवतीला म्हणावे, "अरेरे! आई ! हीं अशी का रडतात बरे ? त्याना काहीं खायला घाल ना ?" कधीं कधीं त्यानी स्वतःच त्याना खावयाला घालावे, व म्हणावे " आता तुम्हाला खावयास घातले आहे, ना ? आता रडू नका बरे ! "

त्याच्या घराजवळ एक लहानसे तळे होते तेरा चवदा वर्षांचे त्याचे वय असताना, ते हात धुवावयास तळ्यावरच जात, व जाताना हातात थोडे तादूळ नेत, व ते तळ्यातील माशाना खाऊ घालीत नागमहाशयाची हाक ऐकताच ते मासे धावून येत व त्याच्या हातावरील तादूळ खात. तादूळ खात असताना ते मासे हातात घेऊन त्याना गोंजारीत, इतके ते त्याच्या सवईचे झाले होते कलकत्त्यास शिकण्यास येईपर्यंत ते तळ्यावर माशाशी खेळत असत वरील गोष्टीची त्याना आठवण होताच ते एकदा म्हणाले, " इतर साधारण जीवाच्या ठिकाणीं देखील कमी अधिक प्रमाणाने ज्ञानाचा विकास दिसून येतो अनेक जन्मानतर त्यानाही उच्चगति प्राप्त होऊन शेवटीं ते मुक्त होतील यात काहीं सशय नाही."

श्रीयुत हरेंद्रचद्र नाग नेहमी नागमहाशयाकडे येत जात असत. एक दिवस सकाळी हरेंद्रचद्र आले असता, नागमहाशय मडपात बसून तबाखू ओढीत होते. थोड्या वेळानें रानांतून दोन साळुक्या येऊन नागमहाशयाच्या जवळ बसल्या. नागमहाशय एकाग्र मनाने तबाखू ओढीत होते, म्हणून त्यांचे लक्ष त्याच्याकडे गेले नाहीं. तेव्हा नागमहाशयाचे आपल्याकडे लक्ष्य जाण्यासाठीं साळुक्यानीं पायानीं जमीन ओरबडण्यास सुरवात केली. नागमहाशयांचें त्यांच्याकडे लक्ष जातांच त्यांनीं त्यांना

अतिशय स्नेहाने कुरवाळले व म्हणाले, " आलात आयानो! बरे केलेंत, तुम्हाला खावयाला देतो थ ! " असं म्हणून घरातून एक मुठभर तांदूळ आणून त्यांनी आपल्या हातांनी त्यांना ते खाऊ घातले. पण तेवढ्यानें त्याची तृप्ति झाली नाहीं, म्हणून ते पक्षी त्याच्या भोवतीं भोवती फिरू लागले मग नागमहाशयानीं एका वाटीत तांदूळ व पाणी आणून हातात दोन्ही वाट्या धरल्या दोन्ही पक्षी त्याच्या हातावर बसून तांदूळ खाऊ लागले, व नंतर पाणी पिऊन झाल्यावर नागमहाशय त्याच्या अंगावर हात फिरवीत फिरवीत म्हणाले " जा बर आता, रानात जाऊन मौज मारा आणि उद्या पुन्हा या ! ' असं म्हणताच दोन्ही पक्षी उडून गेले. तेव्हा नागमहाशय म्हणाले, " भगवान् श्रीरामकृष्ण किती तऱ्हेचे खेळ खेळत आहेत !"

नारायणगंज येथील तागाच्या गिरणीतील काही साहेब देवभोग येथें कधी कधी पाखराची शिकार करण्यास येत एकदा ते आले असता नागमहाशयाच्या कानावर बंदुकीचा आवाज पडला. तसेच ते धावत जाऊन साहेब लोकास हत्या न करण्याबद्दल हात जोडून विनवू लागले त्या साहेबाना त्याचे म्हणणे काहीच कळलं नाहीं, व त्यानीं पक्षी मारण्याकरिता पुन्हा बंदूक भरली. तेव्हा नागमहाशय ओरडून म्हणाले " असले दुष्ट काम तुम्ही करू नका." साहेबाना वाटलं हा मनुष्य वेडा दिसतो, याच्याकडे लक्ष न देणेच चांगले म्हणून त्यानी बंदूक उचलून पक्षावर नेम धरला, तोंच एक निमिषात नागमहाशयानी साहेबाच्या हातातून बंदूक हिसकून घेतली. साहेबानीं बंदूक घेण्याकरिता पुष्कळ झटापट केली पण व्यर्थ. नागमहाशयाच्या जीर्ण देहात त्यावेळी सिंहासारखे बळ कसे उत्पन्न झाले कोणास ठाऊक ! नागमहाशय बंदूक घेऊन घरी आले, व असल्या जीवनाशक शस्त्राला आपण स्पर्श केला म्हणून त्यानीं हात धुऊन टाकिले. इकडे साहेबलोक परत नारायणगंज येथे जाऊन फिर्याद करण्याच्या तयारीस लागले. दुसऱ्या दिवशीं नागमहाशयानीं एका गिरणीतील नोकराच्या हस्ते बंदूक साहेबाकडे परत लावून दिली. गिरणींतील कारकून मंडळींच्या तोंडून नागमहाशयाच्या साधुत्वाच्या गोष्टी ऐकून साहेबाच्या मनांत

त्यांच्याविषयी श्रद्धा उत्पन्न झाली,व त्यापुढे त्यांनीं देवभोग येथे शिकारीस जाणे वर्ज केले. वरील गोष्ट गिरीशबाबूला कळली तेव्हा ते म्हणाले " अहिंसा परमो धर्मः याचा नागमहाशय हेच एक जिवत दृष्टात दिसून येतात. "

निरुपद्रवी प्राण्याचे दु.ख पाहून नागमहाशय कळवळून जात. त्याच्या घराच्या दक्षिण बाजूला एक लहानसे डबके होते. दरवर्षी पाण्याच्या लोंढ्याबरोबर पुष्कळ मासे त्यात वाहून येत, त्यामुळे तेथे पुष्कळ मासे जमा होत. एक दिवस एक कोळी त्या डबक्यावर मासे धरण्याकरिता आला. नतर तेथील रिवाजाप्रमाणे नागमहाशयाना त्यातील हिस्सा देण्या करिता माशाची टोपली घेऊन तो कोळी आला असता, जिवत मासे धडपड करीत आहेत हे पाहून त्याना अतिशय दुःख झाले त्यांनीं कोळ्याला सर्व माशाची किमत विचारली, व त्याने सांगितलेली किंमत देऊन सर्व मासे विकत घेतले, व ते डबक्यात नेऊन सोडून दिले.

आणखी एक दिवस एक कोळी त्यांच्या घराजवळच्या तळ्यावर मासे धरून त्याच्याकडे विकण्याकरिता आला टोपलींतील माशाची तळमळ पाहून नागमहाशयांनीं सर्व मासे विकत घेतले व तळ्यात नेऊन सोडून दिले ! हे नागमहाशयाचे कृत्य पाहून तो कोळी आश्चर्याने चकित होऊन गेला. माशाची किंमत व टोपली हातात पडतांच त्या कोळ्याने एकदम धूम ठोकली, व पुन्हा तो कधींही त्याच्या घराच्या आसपास फिरकला नाही.

नागमहाशयाच्या घरीं देवीची वार्षिक पूजा होत असे, पण त्यानी कधीही बळी दिला नाहीं. एके वेळीं त्यांच्या आंगणांत एक सर्प दिसला, तेव्हा घरातील सर्वजण भिऊन गेले, " हा सर्प मारला तर नाही का चालणार ? " असे त्याच्या पत्नीने विचारले असता नागमहाशय म्हणाले, " वनातला साप चावत नाहीं, मनांतला साप चावतो. " नतर सापाला हात जोडून म्हणाले, "आपण प्रत्यक्ष आई मनसादेवी आहात, जगलात राहता. या दरिद्र्याची कुटी सोडून आपल्या स्थानास परत जा ! " असे म्हणत म्हणत चुटक्या वाजवून रस्ता दाखवीत चाल

लागले. व सापही त्याच्या मागोमाग जाऊन रानात निघून गेला ! नतर नागमहाशय म्हणाले, " आपण कोणाचे अनिष्ट चिंतिले नाही, म्हणजे जगात कोणीही आपले अनिष्ट करू शकत नाही, जो जसा वागतो तसेंच जग त्याच्याशीं वागतें आरशात आपले प्रतिबिंब दिसते. आपण जसे अग वाकडे करू, तसेच प्रतिबिंबही आपल्याला दिसेल.

श्रीरामकृष्णमठ जेव्हा बराहनगर येथे होता, तेव्हा तेथे एकदा सापाचे पिल्लू निघाले; त्याला पहाताच सर्वजण त्याला मारावयाला उठले, इतक्यात नागमहाशय तेथें आले. त्यानीं ' नागराज ! नागराज !' म्हणून त्याला गोंजारून एका निर्भयस्थानीं नेऊन सोडून दिले, व परत आल्यावर म्हणाले, " आम्ही बुद्धीच्या सदोषितेमुळे पाप करून स्वतःलाच कष्ट करून घेतो. ही बुद्धीच जेव्हा ईश्वराच्या पादपद्मीं निश्चल होते, तेव्हा कोणतीच वस्तू वाईट म्हणून बोध होत नाहीं. "

एक वेळ, नागमहाशय तळ्याच्या घाटावर पाण्यात पाय बुडवून ताड धुवित असताना त्याना सर्पदंश झाला. सापाने त्याच्या डाव्या पायाचा अगठा चावून धरला होता. नागमहाशय स्वस्थपणे उभे राहिले. थोड्या वेळाने साप त्याचा पाय सोडून निघून गेला. त्याना सर्पदश झाला असे त्याच्या पत्नीस कळताच ती घाबरी झाली, तेव्हा नागमहाशय म्हणाले " भिण्याचे कारण नाही. खाण्याचा पदार्थ समजून पाण्यातल्या सापाने पाय चाऊन धरला होता, नतर तो सोडून निघून गेला " पुढे म्हणाले " जीवमात्रात एक ईश्वरच विराजमान होऊन राहिला आहे. " नागमहाशय नेहमी हात जोडून बसत. असे का बसता म्हणून एकाने पृच्छा केली असता " प्रत्येक भूतमात्रात ईश्वर प्रत्यक्ष दिसतो म्हणून ! " असे त्यानीं उत्तर दिले. झाडाचे कोणी पान जरी तोडले तरी त्याच्या अतःकरणाला भयकर वेदना होत ! त्याच्या स्वयपाक घराच्या पाठीमागे एक आंब्याचे झाड होतें. एकदा त्याच्या एका भक्ताने त्याचे एक पान तोडलेले पाहून नागमहाशय म्हणाले, " अरेरे कशाला पान तोडलेस ? यानाही सुखदुःखाच्या सवेदना आहेत ना ? " त्याच्या घराच्या पूर्वेकडील भागापाठीमागे एक कळकाचे बेट होते. त्याच्या फाद्या कधीं घरात येत, परतु

त्यानीं त्या कधींही तोडून दिल्या नाहींत, उलट म्हणत, "जे बनविणे शक्य नाहीं ते मोडणे चागले काय ?" त्यानी माशीसुद्धा कधीं मारली नाही. पुष्कळ वेळा ढेकुणास देखील त्यानी आपल्या बिछान्यावर मोठ्या आदराने जागा द्यावी ! अगावर मुगी चढली तर तिला मोठ्या काळजीने धरून सुरक्षित स्थळीं नेऊन सोडावे ! कधीं कधीं त्याच्या मनाची मोठी विलक्षण स्थिति होत असे, त्या वेळी आपल्या पायाखाली सापडून जीवजतु मरतील म्हणून त्याच्याने चालवतही नसे ! तसेच श्वासोश्वासानीं अदृश्य कीटक नाश पावतील म्हणून कधीं कधी त्याचा श्वासोश्वासही बद होत असे !

एकदा त्याचा एक भक्त मडपात बसला असता पूर्वेच्या बाजूच्या कळकाच्या कुपणास वाळवी लागलेली त्याला दिसली. त्याने लगेच उठून कळकावर जोराने काठीचा तडाखा लगावला, त्याबरोबर पुष्कळ कळक फुटून गेले, व सर्व वाळवी निराश्रित होऊन खालीं मातीत पडली. नागमहाशय त्याच मडपाच्या एका बाजूस बसले होते. ते कृत्य पाहाताच ते कळवळून म्हणाले "हाय हाय, काय केलेस हे ? किती दिवसापासून तरी त्या वेळूच्या टोकावर वाळवीने घर करून त्यात वास केला होता, आज तू त्याचा आश्रय नष्ट केलास ! हा मोठा अपराध आज तू केलास !" असे म्हणता म्हणता त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या हा प्रकार पाहून तो भक्त बिचारा अगदीं स्तभित झाला. शेवटी नागमहाशय त्या निराश्रित कीटकापुढे येऊन म्हणाले, "आपण आणखी खुशाल घर करून रहा, पुन्हा तुम्हाला कोणी त्रास देणार नाहीं." पुढे वाळवीने हळू हळू पुन्हा तेथेच घर केले पुढे काहीं कालानतर ते टोक पडून गेले. नागमहाशयानी त्या टोकास कोणालाही हात लावू दिला नाही.

नागमहाशय गाईची भक्ती-पूर्वक सेवा करीत. त्यानीं कधी शास्त्रोक्त विधीने गोदान किंवा गोपूजा केली कीं नाहीं, हे माहीत नाही, परतु अगदीं लहान वयापासून, ते गाय दृष्टीस पडली कीं तिला नमस्कार करीत असत. कधीं कधीं गाईची पदधूली घेताना त्याना पुष्कळांनीं पाहिले आहे.

एकदा त्यानी एक ऊस आणला. रस्त्याने जाणारी एक गाय येऊन ती ऊसाचा शेडा खाण्याकरिता धडपड करू लागली. नागमहाशयाच्या हे नजरेस येताच त्यानी तो तिला मोठ्या प्रेमाने खावयास दिला, व तिला " जगदबे ! " म्हणून नमस्कार केला मग उसाचे लहान लहान तुकडे करून त्या गाईच्या अगावर हात फिरवीत फिरवीत तिला खाऊ घालू लागले ! गाईचे ऊस खाणे चालू असताना तिला पख्याने वारा घालू लागले ! व यातच इतके तन्मय होऊन गेले की, शेवटी सज्ञाहीन होऊन मातींत पडले !!

नागमहाशय स्वतः शक्तीउपासक होते. पण ते म्हणत, "पथात किंवा मतात काही नाहीं कोणत्याही मताने का होईना आत्यतिक भक्ति उत्पन्न झाली, म्हणजे ईश्वरच स्वत. मार्गदर्शक होतो " त्याच्याजवळ शैव, वैष्णव, बाऊल, कर्ताभजा वगैरे सर्व साप्रदायी लोकाना सारखाच मान मिळत असे

हिदुमुसलमान वगैरे कोणत्याच तऱ्हेचा भेदभाव त्याच्याजवळ नव्हता मशीद, पिराच स्थान ख्रिश्चन मदीर या सर्वास ते नमन करीत ख्रिश्चन प्रार्थना मदीर दिसले असता ' जय येशू ! ' म्हणून नमस्कार करीत. साधनासबधी ते म्हणत, " पहारेकरी जसा सदा जागृत रहातो, तसेच साधन भजनद्वारा स्वतःला जागृत ठेविले पाहिजे, पण सर्व खजिन्याची किल्ली मात्र एका परमेश्वराच्याच हातात असते त्याने कृपा करून ज्ञान करून दिले तरच जीव उच्चावस्थेस जाऊन पोहचतो, नाही तर सर्व व्यर्थ. कोणी तर साधन भजन न करिताच केवळ ईश्वरी कृपेने उच्चावस्थेस पोहचतात व अशानाच कृपासिद्ध म्हणतात ईश्वर कृपा करीपर्यत कोणीही त्याचे यथार्थ रूप समजू शकत नाहीं. ईश्वर कल्पतरु, जो जे मागेल ते त्याला मिळते, म्हणून जन्ममृत्यूच्या फेऱ्यात टाकणाऱ्या इच्छा, जीवाने करणे अर्थातच केव्हाही उचित नाहीं. ईश्वराच्या चरणी शुद्ध भक्ति व शुद्ध ज्ञान याचीच याचना करणे श्रेयस्कर, व त्याच्या कृपेच्या बळाने जीव संसारबधन तोडून मुक्त होतो. "

"ससाराच्या वासना केव्हांही जीवाला दुःखदायकच होतात, त्यापासून

सुखाची आशाच नको, पण जो मनुष्य संसारवासना सोडून ईश्वर, त्याचे भक्त व त्याचे गुणानुवाद या मध्येच आपला काळ घालवितो, त्याचे त्रिताप शेवटी नाश पावतात व तो मुक्त होतो "

सिद्धीसंबंधी नागमहाशय म्हणत, "खरें साधुत्व अंगीं बाणत असताना शक्ति, सिद्धि, ऋद्धि ह्या त्या साधकाला मोहित करतात, पण, ज्याप्रमाणे स्फटिकात सर्व वस्तूंचे प्रतिबिंब दिसतें, पण स्फटिक सर्व उपाधींपासून निर्लिप्त असतो. त्याप्रमाणे यथार्थ साधूच्या मनात या जगातल्या सर्व वस्तूंचे नुसतें प्रतिबिंब मात्र पडत असतें. त्याच्या मनात कोणताच संकल्प विकल्प उत्पन्न होत नाहीं. पण जर एकाद्या साधकाच्या मनात विषयाचे सत्यत्व दृढ झाले, तर तो अर्थातच उच्चमार्गापासून पद-भ्रष्ट होतो."

कोणाच्या मनात काही शंका उत्पन्न होताच, नागमहाशय, त्याने प्रश्न करण्यापूर्वीच तिचे निरसन करीत. कोणाचा कोणता भाव, कोण किती उच्च दशेला पोहचला आहे, हे ते तोंड पहाताच ओळखीत असत. त्यांनीं सांगितलेल्या विशिष्ट लोकांसंबधीच्या सर्व गोष्टी खऱ्या असल्याचे अनुभवास आले आहे कोणी त्याच्या दर्शनाकरिता देवभोग येथें येण्यास निघाला असता, तो येऊन पोहचण्यापूर्वीच नागमहाशय पत्नीला म्हणत " आज अमुक अमुक गृहस्थ येत आहे, तेव्हा मला आता बाजारात गेले पाहिजे.' त्यानीं एकाद्या गृहस्थाचें स्मरण केले, तर तो गृहस्थच त्याच्याकडे येई !

माझा एक नातेवाईक श्रीयुत अश्विनीकुमार चक्रवर्ती एकवेळ माझ्याबरोबर नागमहाशयाच्या दर्शनास निघाला अश्विनीकुमाराला शूळाची व्याधि होती. ती इतकी कीं, दररोज संध्याकाळपासून सकाळ-पर्यंत तो निचेष्ट होऊन पडत असे. देवभोग येथे आम्हीं येत असताना रस्त्यातच आम्हाला संध्याकाळ झाली, तेव्हा आतां शूलवेदना उपस्थित होतात कीं काय, असे आम्हाला भय वाटू लागलें. परंतु ईश्वरकृपेनें रस्त्याने काहींही त्रास न होता आम्हीं देवभोग येथें निर्विघ्नपणें येऊन पोहोचलो. तेव्हा अश्विनीकुमार मला म्हणाला "आतां वेदनेची वेळ

टळून गेली." सतत पाच महिने अश्विनीबाबूंनीं रात्रीचें अन्न पाणी घेणे वर्ज केले होते, परतु त्या दिवशीं त्यानीं सपाटून जेवण केले, व त्याना झोपही चागली लागली काही दिवसानतर अश्विनीबाबू म्हणाले "अशा महापुरुषाच्या आगची पवित्र हवा माझ्या अगाला लागून माझी जन्मजन्मातराच्या पापाचे फळरूप–भयकर व्याधि नष्ट झाली, व मी त्याना तेव्हा तसाच धरून राहिलो असतो, तर माझ्या नरजन्माचे सार्थक झाले असते." एकदा देवभोग येथे एका विधवा ब्राह्मणीचे मूल पटकीने आजारी झालें, तेव्हा त्याची आई त्याला मूर्छित अवस्थेतच नागमहाशयाच्या घरात ठेऊन निघून गेली ईश्वरकृपेने ते बालक बरे झाले "ते मूल बरे होण्याचे कारण काय, तुम्ही कोणता उपाय केला?" असे त्याचे मित्र सुरेशबाबू यानी विचारले असता ते म्हणाले "बालक चागले झाले खरे, पण त्या बाबतीत मी काहीच सागू शकत नाही"

एकदा एका चैत्र मासात नागमहाशयाच्या घराच्या उत्तरेस असलेल्या चौधरी बाबूच्या घराला आग लागली तेव्हा वारा फारच जोराचा असल्यामुळे आग जास्त भडकत चालली चौधरी बाबूच्या घरापासून नागमहाशयाचे घर २५–३० हात अतरावर होते. तरी तेथे आगीच्या ठिणग्या येऊन पडू लागल्या. आग विझविण्याकरिता सर्व मोहल्यातील लोकाचा घोळका जमला होता. फक्त नागमहाशय एकटेच हात जोडून शातपणे अग्निसमोर उभे राहिले होते आगीच्या भयाने त्याची पत्नी घरातील सामान, कपडे, लेप वगैरे बाहेर काढण्याच्या कामात मग्न झाली होती. पत्नीचे वरील कृत्य पहाताच नागमहाशय म्हणाले, "अजूनही ईश्वरावर अविश्वास अ? ह्या क्षुद्र कथा आणि गोधड्या त्यातून काढून काय होणार? आज प्रत्यक्ष ब्रह्मा आपल्या घराजवळ आला आहे, तेव्हा त्याची नीट पूजा अर्चा करावी ते कोठेच राहिले, आणि त्या दीड दमडीच्या कपड्यामागे तू अशी काय लागली आहेस?" असे म्हणून 'जय रामकृष्ण! जय रामकृष्ण!' असे म्हणत ते आपल्या अगणांत टाळ्या पिटून नाचू लागले. नतर म्हणाले "देव तारी त्यास कोण मारी!

आणि देव मारी त्यास कोण तारी? " चौधरी बाबूचे घर भस्मसात् करून अग्नि शांत झाला. नागमहाशयाच्या घरातील एक गवताची काडीही जळाली नाही !

नागमहाशय कलकत्त्यास असताना ते एका सूर्य ग्रहणाच्या पूर्वी ४–५ दिवस देशात गेले. त्याना पाहून दीनदयाळ म्हणाला, " सर्व लोक पर्वकाळी गगेचे स्नान घडावे म्हणून सहपरिवार गगेस जातात, व तू गगात्याग करून आज येथे आलास ! मला तुझ्या धर्मकर्मांचे मर्म काय आहे काही कळत नाहीं. अजून तीन चार दिवस अवकाश आहे, तू मला गगातीरी घेऊन चल." नागमहाशय म्हणाले " मनुष्याची जर उत्कट भक्ति असली तर, आई गगा, घरीच येऊन दर्शन देते. त्याला कोठेच जावे लागत नाही." असे म्हणून स्तब्ध राहिले. गगास्नानाचा दिवस उजाडला. श्रीमती हरकामिनी, श्रीयुत कैलास बसू वगैरे भक्त मडळी देवभोग येथेच नागमहाशयाच्या घरीं होती गगास्नानाच्या योगाची वेळ येताच, श्रीमती हरकामिनीच्या दृष्टीस पडले की, नागमहाशयाच्या घरातील आगणाच्या आग्नेय दिशेच्या कापऱ्यात जमिनीतून मोठ्या जोराने कारजा-प्रमाणे पाणी वर उडत आहे ! हळू हळू पाणी झुळ झुळ वाहू लागून सर्व आगण पाण्याने भरून गेले ! तेव्हा त्याच्या घरी जमलेली भक्त मडळी आनदाने नाचू लागली. नागमहाशय घरात बसले होते, ह्या लोकाचा गलबला ऐकताच ते बाहेर आले, व "जय आई, पतितपावनी ! आई भागिरथी !" असे म्हणून त्या पाण्याच्या फवाऱ्याला त्यानी साष्टाग नमस्कार घातला, व बोटानीं त्या पाण्याला स्पर्श करून ते आपल्या मस्तकाला लाविलें, व पुन्हा नमस्कार करून ते तेथून निघून गेले. नतर घरातल्या सर्व लोकानीं तेथे स्नाने केली. गावात वरील बातमी कळताच लोकाच्या झुडींच्या झुडी येऊन स्नान करू लागल्या व नागमहाशयाचें आगण " जय गगे ! जय भागीरथी ! " या ध्वनीने दुमदुमून गेले ! सुमारे अर्ध्या तासानतर पाण्याचा जोर कमी झाला, व क्रमाक्रमाने आग-णातले सर्व पाणी नाहीसे झाले. देवभोग येथील वृद्ध लोक अजूनही वरील गोष्टीची साक्ष देतात. श्रीमती हरकामिनीचा पुष्कळ दिवसाचा

गुल्म रोग ह्याच पाण्याच्या स्नानाने नाहीसा झाला आजीवन, वरील गोष्ट नागमहाशयानी स्वतःच्या मुखाने उच्चारली नाही या बाबतीत लोकानी खोदून विचारले असता त्यानी म्हणावे "हाय ! हाय ! लोक काचेलाच हिरा म्हणून समजतात !" असो. वर घडलेली हकीकत स्वामी विवेकानद याच्या कर्णपथावर आली असता ते म्हणाले, "नाग-महाशयासारख्या महापुरुषाच्या इच्छामात्रकरून जीवाचा सुद्धा उद्धार होऊ शकतो, मग त्याच्याकडून वरच्यासारख्या गोष्टी घडणे मुळीच अशक्य नाही."

नागमहाशय आयुष्यातील घडणाऱ्या सर्व गोष्टीकडे "कर्ता करविता सर्व श्रीरामकृष्ण देव," या दृष्टीने पहात त्यामुळे त्याना सर्व ठिकाणी श्रीरामकृष्णरूपच दिसे. एक दिवस मीं त्याच्या घरी निजलो होतो. काहीं आवाज झाला म्हणून माझी झोप मोडली. काही वेळाने नागमहा-शयाच्या ओरडण्याचा आवाज माझ्या कानावर आला. मी तावडतोब उठून ते ज्या स्वयपाक घरात निजत तेथे धावतच गेलो तेथे असे कळले की, वरून एका माजराने त्याच्या तोंडावर उडी मारली आहे त्याच्या पत्नीने दिवा लावून पाहिले तो त्याच्या डाव्या डोळयाच्या बुबुळाला माजराची नखे लागून थोडी जखम झाल्याचे दिसले. ती जखम पाहून त्याची पत्नी रडू लागली असता ते म्हणाले, "तू रडू नको, विशेष काही नाहीं. या क्षुद्र देहाची कशाला एवढी चिता करतस ? श्रीरामकृष्णच स्वतः माजराचे रूप घेऊन येऊन मला माझ्या पापाचे शासन करून गेले ! ही सर्व केवळ श्रीरामकृष्णाचीच कृपा आहे." मी पुष्कळ आग्रह केला, तेव्हा त्यानी डोळयावर २–४ दिवस पाण्याची पट्टी ठेविली व ईश्वर कृपेने त्या पट्टीनेच त्याचा डोळा चागला बरा झाला.

कलकत्त्यास असताना नागमहाशयाच्या दोन्ही हाताला कसलीशी व्याधि जडली. त्याना हात बिलकुल हालविता येईनात हात जोडून बसले कीं बरे वाटे ! म्हणून ते म्हणत, "सर्वदा हात जोडून रहाण्याची शिकव-णूक म्हणून, श्रीरामकृष्णानी मला ही व्याधि जडवून दिली !"

नागमहाशयाना शूलाची व्यथा होती शूलाच्या वेदनानी जेव्हा त्याचा जीव व्याकूळ होई, तेव्हा त्याना खालील शब्द उच्चारताना सर्वांनी ऐकिले

आहे. ते म्हणत " जय प्रभू श्रीरामकृष्ण ! आपला जयजयकार असो ! या क्षुद्र हाडामासाच्या सापळ्याकडून जेव्हा आपली सेवा घडत नाहीं, तेव्हा या वेदना लावून त्याला शिक्षा करिता त्यामुळेच आपले स्मरण होते ! धन्य ती शूलव्यथा, की जिच्या योगानें श्रीरामकृष्ण देवाचे स्मरण होते ! धन्य आपण, धन्य आपली कृपा ! गुरु कृपाहि केवलम् ! गुरु कृपाहि केवलम् ! आपल्या कृपेशिवाय जीवाना दुसरा उपाय नाही."

नागमहाशय कधीही कोणाला उपदेश देण्याचा आव दाखवीत नसत कोणी एखादा विषय समजावून घेण्याची इच्छा दर्शविली तर म्हणत, ' कोण कोणाला काय समजावून देणार ? ईश्वराच्या कृपेने योग्य वेळ येताच, जीवाचे अतश्चक्षु आपोआप उघडल जातात, आणि "जेथ जेथ नेत्र पडे, तेथ तेथ कृष्ण स्फुरे, " अशी स्थिति झाली म्हणजे जीव जे काहीं पहाता ते निराळयाच रगाने रगलेल त्याला दिसते. " अस जरी ते म्हणत तरी एखादा जिज्ञासु अगदी हताश दिसला, तर त्याला आश्वासनपूर्वक म्हणत " जन्मपरपरा सपल्याशिवाय श्रीरामकृष्णाच्या नामावर विश्वास जडत नाही. ईश्वराच्या ठिकाणी एकातिक निष्ठा बसली म्हणजे कोणाचाही पाय बेताल पडत नाही धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चारी पुरुषार्थ त्याच्या हस्तगत होतात. "

श्रीयुत गिरीश म्हणतो " पूज्यपाद स्वमी विवेकानद व नागमहाशय याना महामाया बद्ध करू गेली असता तिची फारच तारबळ उडाली. विवेकानदाना ती जसजशी बाधू लागे तसतसे ते मोठे होत. शेवटी महामायेची दोरीच त्याना बाधण्यास पुरेना ! शेवटी विवेकानद इतके मोठे झाले की, महामायेला त्याना बाधणे अशक्य वाटून तिनें तो नाद सोडून दिला ! ! मग महामायेने नागमहाशयास बाधण्याची कबर बाधली पण इथे वरच्या उलट प्रकार घडला. महामाया जसजशी त्याना बाधू लागली, तसतसे ते लहान लहानच होऊ लागले ! शेवटी ते इतके लहान झाले की, महामायेच्या जाळ्याच्या छिद्रापेक्षाही लहान होऊन, ते त्यातून सहज निसटून गेले ! ! " वरील प्रकारची गिरीशाची उक्ति या महापुरुषाच्या बाबतींत अयुक्त आहे, असे कोण म्हणेल ?

# प्रकरण सातवें.



## भक्तसहवास.

नागमहाशयाचा मंत्र घेऊन कोणी शिष्य झालेला आहे असें कांहीं ऐकण्यात येत नाहीं. शास्त्राचे विधि व नियम त्यांनीं स्वतः कधींच उल्लंघिले नाहींत, व दुसऱ्या कोणाला उल्लंघन करितांना पहातांच त्यांना अतिशय दुःख होई. शूद्राला मंत्र देण्याचा अधिकार नाहीं, व हा नियम नागमहाशयांनीं कधींही मोडला नाहीं त्यांच्या कृपेनें पुष्कळ लोक सन्मार्गाला लागले तसेंच उच्च अवस्थेसही जाऊन पोंहचले, पण गुरु-शिष्य-भाव नागमहाशयांच्या मनांत कधींच उदय पावला नाहीं. कोणी त्यांना गुरु म्हणून संबोधलें तर ते आपलें डोकें जमिनीवर आपटीत व म्हणत, " मी शूद्र क्षुद्र ! मला काय समजतें ? आपण मला आपली पदधूली देऊन पवित्र करण्यास आलें आहांत ! ईश्वराच्या कृपेनें मला आपलें दर्शन घडलें. ! "

नागमहाशयांच्या एका ब्राह्मण भक्तानें दीक्षा देण्याबद्दल त्यांना अतिशय विनविलें तेव्हां ते म्हणाले " आपण एक तर ब्राह्मण, आणखी सुशिक्षित तेव्हां आपण हा नाद सोडून देणें उचित. समाज मर्यादा व शास्त्राची आज्ञा न मानल्यामुळेंच लोकांची अशी दुर्दशा होत चालली आहे. श्रीराम-कृष्णांच्या उपदेशानुसार मला माझें आयुष्य ठीक ठीक गृहस्थधर्म पालन करण्यांत घालविलें पाहिजे, त्यांत एक रेसभरही इकडे तिकडे करण्याची मला शक्ति नाहीं," हें ऐकून वरील भक्ताचा चेहरा म्लान झाला. तेव्हां नागमहाशय म्हणाले " आपण असे म्लान कां झालां ? चिंता करूं नका, साक्षात् सदाशिव आपला मंत्रदाता गुरु होईल. " वरील ब्राह्मणानें स्वामी विवेकानंद यांचे जवळून दीक्षा घेतली, ही गोष्ट नागमहाशयास कळली तेव्हां ते आनंदित होऊन म्हणाले, "हल्लींच्या काळीं श्रीरामकृष्णांचे संन्यासी भक्तगणच जगताचे दीक्षागुरु, त्यांच्याजवळून जो दीक्षा घेईल तो धन्यच होईल."

नागमहाशयाचा जरी कोणी मंत्र-शिष्य नव्हता, तरी त्याचा भक्तसमुदाय फार मोठा होता. नागमहाशयाचे आपल्या भक्तावर स्नेहमयी-मातेप्रमाणे प्रेम असे, व सदोदित त्याच्यावर त्याची कृपादृष्टि असे भक्त दूर असो, जवळ असो, कुठेही असला तरी त्याची स्नेहमय दृष्टि त्याचेवर सर्वकाली सारखीच असे एक दिवस त्याचा एक भक्त त्याच्या दर्शनासाठी फार व्याकूळ झाला तो भक्त डाक्का येथे कॉलेजात शिकत असे. डाका येथून आगगाडीने तो नारायणगंज येथे येऊन पोहोचला, तेव्हा संध्याकाळ झाली होती. ते पावसाचे दिवस असल्यामुळे सर्व प्रदेश जलमय झाला होता. एकतर संध्याकाळचा अंधःकार, आकाश गाढ मेघाच्छादित, व त्यातच पावसाची सतत धार! नारायणगंज येथील श्रीलक्ष्मीनारायणाच्या मंदिराजवळून देवभोगचा रस्ता होता. पावसाळ्यात तेथून नावेने जावे लागत असे. भक्त जव्हा त्या मंदिराजवळ येऊन पोहोचला, तेव्हा तेथे एकही नाव नव्हती. परंतु त्याने निराश न होता पाण्यातून पोहून जावयाचा निश्चय केला! नागमहाशयाचें स्मरण करून भक्ताने मोठ्या आवेशाने पाण्यात उडी घेतली. पोहत पोहत रात्री ९ वाजता त्याचे अतिशय थकून गेलेलें शरीर नागमहाशयाच्या घराच्या उत्तरेस असलेल्या बागेच्या काठाशीं लागले. वृष्टी चालूच होती. भक्त काठाशीं पोहोचताच पाहातो तो नागमहाशय आपली वाट पहात तेथेच उभे! त्याला पहाताच नागमहाशय म्हणाले, "हाय हाय! काय केलेस हे? किती तरी भयंकर साप या पाण्यात वाहून येत आहेत, आणि पाऊस म्हणजे मी म्हणत आहे, अशा वेळीं का या पाण्यातून कुणी येत असते?" भक्त काहींही प्रत्युत्तर न करिता नागमहाशयाच्या मागे मागे चालू लागला घरीं पोहोंचताच नागमहाशयाच्या पत्नीनें त्याला कोरडे वस्त्र नेसावयास दिलें व त्याबरोबरच मोठ्या प्रेमळपणाने त्याला रागेही भरली. नागमहाशयाच्या पत्नीची प्रेमळ कानउघाडणी ऐकून भक्त रडत रडत म्हणाला "नागमहाशयाचें दर्शन न घेता रहाणे मला असह्य झाले म्हणून असे साहस करून आलो." सदरहु भक्त नेहमीं शनिवारीं कॉलेजला सुटी झाली कीं येत असे. असो. नागमहाशयांची पत्नी त्याच्याकरिता स्वयपा-

काची तयारी करू लागली तो वाळलेली लाकडे नाहींत असें तिला दिसलें. नागमहाशयास हे कळताच घराच्या खुट्या काढण्यास त्यानीं आरभ केला! भक्ताने त्याना असे न करण्याबद्दल पुष्कळ विनविले, पण त्यानी ऐकिले नाहीं! तेव्हा त्याची पत्नी त्यांना निवारण करू लागली असता नागमहाशय खुटी कापत कापत म्हणाले, "ज्याने मला भेटण्यासाठी प्राणाची पर्वा न ठेविता, सापाच्या मुखातून पाण्यातून पोहून आगमन केले, त्याच्याकरिता एका सामान्य घराची मायाही मला टाकता येऊ नये काय? माझा प्राण देऊन जर मी याला मदत करू शकलो तरच माझ्या देहाचे खरे सार्थक होईल!" श्रीमती निवेदिता इच्या The master as I saw him या ग्रथात सदरहु हकीगत विशेष वर्णन केलेली आहे. त्यात वरील भक्ताच्या मुखातून "नागमहाशयाच्या अपार कृपेमुळेच माझे त्या दिवशी रक्षण झाल यात सदेह नाही," असे उद्गार निघाल्याचे लिहिले आहे.

आणखी एका भक्ताला नागमहाशयानी आत्महत्येच्या पातकापासून वाचविले आहे सदरहु भक्त त्यावेळी बोर्डिंगात राहून विद्यासागर महाशयाच्या कॉलेजात बी. ए. चा अभ्यास करीत होता त्याने सागितलेली हकीगत खालीलप्रमाणे आहे. तो म्हणतो—"एक दिवस रात्री मी बोर्डिंगच्या गच्चीवर एकटाच हिंडत होतो. जिकडे तिकडे शातता होती. पिठासारखे शुभ्र चादणे पडले होतें. पण फक्त माझ्याच हृदयात अतिशय अशातता होती. बरेच दिवसात नागमहाशयाचे व देवभोगचे दर्शन झाले नव्हते म्हणून हृदयाला तळमळ लागली होती. श्रीरामकृष्णाच्या भक्त मडळीकडे जाऊन, नागमहाशयाच्या चार गोष्टी ऐकून मन शात करीन म्हटले तर माझी अजून त्या भक्तमडळीशीं ओळख झाली नव्हती. नागमहाशय दरवर्षी शारदीय पूजेच्या पूर्वी पूजेचे साहित्य विकत घेण्याकरिता कलकत्त्यास येत. परतु वरील दिवशीं, त्याच्या येण्याच्या दिवसापर्यंत दम धरणे मला अशक्य झालें. मनात येऊ लागले की 'हाय! अशा महापुरुषाचा लाभ झाला असूनही मी त्याना गमावून बसलों आहे, भग जिवत रहाण्याचे तरी काय प्रयोजन!" विचार करिता करिता मनात आले कीं

वरून उडी टाकून आत्महत्त्या करावी. दृढ निश्चय करून आता उडी टाकणार, इतक्यात कोणी म्हटल्यासारखे ऐकू आले कीं ' उद्या सकाळी नागमहाशयाची भेट होईल !' हे शब्द ऐकताच माझ्या अंगावर शहारे आले. मी तर तसाच खालीं येऊन आपल्या बिछान्यावर पडलो व काही वेळाने मला झोप लागली दुसऱ्या दिवशीं सकाळी मी तोंड धुवत असताना कोणी आपलें नाव घेऊन हाका मारीत आहे असें मीं ऐकिले. म्हणून तावडतोब उठून दार उघडले व पहातो ता, हातात एक गाठोडी घेऊन नागमहाशय उभे आहेत ! मला पाहून ते म्हणाले " तुमच्याबद्दल मला एकाएकीं चिंता वाटू लागल्यामुळे मला कलकत्त्यास यावे लागले " पुढे म्हणाले " अरे, भीति कशाची ? व चिंताही कशाची ? तुम्ही श्री रामकृष्णाच्या राज्यात येऊन पोहचला आहात, तेव्हा आता तुम्हाला काही काळजी नको ! आत्महत्त्या म्हणजे महापाप." नतर म्हणाले "इतके दिवस तुम्ही नाले खोले हिंडत होता, आता तर समुद्रात येऊन पडले आहात !" अर्थात् श्रीरामकृष्णलीलासमुद्र !

नागमहाशय नतर वरील भक्ताला घेऊन बेलूड मठात गेले व सन्यासी भक्तगणाला म्हणाले, " हा मनुष्य मोठा चचल आहे, याला आपल्या चरणांजवळ ठेवा. याची बुद्धि फार चागली आहे. जेणेकरून श्रीरामकृष्ण याच्यावर कृपा करतील इकडे लक्ष ठेवा "

जे सर्व भक्त त्याचेकडे नेहमी येजा करीत, त्याना नागमहाशय म्हणत, " तुम्हीं मला माझ्या स्वत.पेक्षाही ज्यास्त प्रिय आहात," माझा प्राण देऊनही जर तुम्हाला काहीं फायदा होत असेल तर खरोखर मी प्राण देण्यासही तयार आहे. यापेक्षा आणखी या हाडामासाच्या पिंजऱ्याने काय होणार ?" त्यांच्या भक्तगणामध्ये कोण साधारण व कोण श्रेष्ठ हे सागता येत नाही विशेषतः सर्वांशींच लेखकाची ओळखही नाहीं व पुष्कळाचे नावही पण त्याला माहीत नाहीं. अजाणपणाने जर या ग्रथात काणाचा उल्लेख करावयाचा राहून गेला असेल, तर त्यानीं उदारपणें लेखकाला क्षमा करावी.

नागमहाशयांच्या भक्तगणामध्ये त्याच्या पत्नीचाच उल्लेख सर्वाच्या

अगोदर करणें योग्य आहे. का तर भक्त या नात्याने तिचेच स्थान पहिले आहे. नागमहाशयाची पत्नी अगदीं पहाटे सर्वांच्या अगोदर उठून आपली गृहकृत्ये करण्यास सुरवात करी संसारातील सर्व काम टपटोपून नंतर ती देवपूजा करावयास बसत असे. पूजा झाल्यावर स्वयपाक करून अतिथीअभ्यागताचे भोजन झाल्यावर मग नागमहाशयास भोजन घाली, व नंतर स्वतः थोडा फार आहार करीत असे संसारातील सर्व काम ती एकटीच करीत असे स्वतःची भगिनी श्रीमती हरकामिनी इला सुद्धा कोणत्याही कामाला हात लावू देत नसे नागमहाशयाच्या भक्तापैकीं हल्लीही जे देवभोग येथें जातात, ते एकमतान म्हणतात की तिच्या अंगच्या सेवा, उद्योग, सहनशीलता वगैर गुणाचा अजूनसुद्धा एक रेस-भरही ऱ्हास झाला नाही ती पूर्वीप्रमाणेच हल्लीही आपली सर्व कामे अत्यंत दक्षतेने करीत असते "नागमहाशयाच्या भक्तगणावर ती आपल्या अपत्याप्रमाणें प्रेम करीत असे व भक्तगणही तिला आपल्या मातेप्रमाणे मान सन्मान देत नागमहाशयाची स्मृति व पवित्र भस्मराशि आपल्या वक्षस्थलावर धारण केल्यानें देवभोग हल्ली मोठ तीर्थस्थान बनले आहे पुण्यश्लोक नागमहाशयाच्या समाधीच्या दर्शनास पुष्कळ लोक जमतात, त्यात जे नागमहाशयाच्या हयातींत त्याच्या दर्शनाकरिता देवभोग येथें पूर्वी येऊन गेलेले असतात, ते म्हणतात "आदर, अतिथीसत्कार याच्या रूपाने त्या पुण्य पुरुषाचा पवित्र प्रभाव देवभोग येथे अजूनही जिवत राहिला आहे."

नागमहाशयाच्या पत्नीला त्याच्यावाचून या जगात इतर काहींही प्रिय नसे व हल्लीही नाही. नागमहाशयाच्या प्रतिमेची पूजा केल्या-शिवाय ती पाणीही तोंडात घालीत नाही नागमहाशयाच्या हयातींत एक वर्षी, अष्टमीच्या पूजेच्या दिवशी, त्याच्या पायावर पुष्पांजली वहा-ण्याची त्याच्या पत्नीस उत्कट इच्छा झाली. हे एकून नागमहाशयाना फार राग आला तथापि त्या दिवशी केव्हासे, ते घराच्या कोपऱ्यात विचारमग्न होऊन उभे असता त्याच्या पत्नीने ती संधी साधून त्याच्या पायावर पुष्पांजली वाहिली. तेव्हा नागमहाशय म्हणाले, "ज्याची तू

पूजा करतेस, त्याची सेवाही पूजा नाहीं काय !" त्याच्या पत्नीने त्याच्या चरणीं अर्पण केलेले फूल एका सोन्याच्या ताईतात घालून तो ताईत आपल्या गळ्यात धारण केला.

श्रीयुत हरप्रसन्न जेव्हा पहिल्यानेच नागमहाशयाच्या दर्शनास आला, तेव्हा त्याच्या पत्नीला पाहून त्याच्या मनात आले कीं " हे तर साधू. आणखी मग त्याना पत्नी कशी ? " नागमहाशयानीं त्याच्या मनातला भाव ओळखला, व लगेच म्हणाले " का बरे ? यात काय दोष आहे ? ती तर आई अन्नपूर्णा आहे. खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था करून देते " स्नेह, दया त्याग, तितिक्षा, परोपकार वगैरे सर्व गुण नागमहाशयाच्या पत्नीच्या ठिकाणीं पाहून वाटते की, मूर्तीमत तपस्याच स्त्री रूपाने अवतरली आहे. नागमहाशय विद्यमान असताना जे कोणी भक्त नियमितपणे देवभोग येथे दर शनिवारीं येत, त्याच्याकरिता त्याची पत्नी नाना तऱ्हेचे पदार्थ तयार करून ठेवी नागमहाशयाच्या घरी वर्णाश्रम धर्माचे रतीभरही अतिक्रमण होत नसे ब्राह्मणाला स्वहस्ते स्वयपाक करून खावे लागत असे. ब्राह्मणाच्या जेवणाचे वेळी नागमहाशय अगणात एका बाजूला हात जोडून उभे रहात व त्याची पत्नी ब्राह्मणाच्या जवळ उभी राहून जेवण्याचा आग्रह करी. देवभोग येथे आलेल्याना आपण एकाद्या साधूच्या आश्रमात आलो आहो असे कधींही वाटत नसे. सर्वाच्या मनात आपण आपल्या मातापित्याजवळ आहो असेच वाटे !

नागमहाशय ब्रह्मलीन झाल्यावर पूज्यपाद स्वामी विवेकानद आपल्या पूर्व इच्छेनुसार एक वेळ देवभोग येथे आले. पूर्वी स्वामी विवेकानद येणार म्हणून नागमहाशयानीं शौचकूपाची वगैरे व्यवस्था अगोदरच केली होती. स्वामीजी मागे म्हणाले होते कीं, मी नागमहाशयाच्या घरी जाऊन खेड्याचेच रीतिरिवाज पाळीन व तेथील चालीप्रमाणेच वागेन, त्याप्रमाणेच त्यानीं केले, देवभोग येथे एक दिवस राहून स्वामींनीं डाक्का येथें प्रयाण केले. जावयाचे वेळीं नागमहाशयाच्या पत्नीने त्यांना एक वस्त्र दिलें होतें, ते त्यानीं डोक्याला गुडाळून नागमहाशयाचे गुणगान करीत देवभोग सोडले. नागमहाशयाच्या एका भक्तान स्वामींना पूर्वी

पूर्व बंगाल्यात धर्म प्रचार करण्याकरिता यावयास विनविले असतां ते म्हणाले होते कीं, "त्या देशात येऊन वक्तृत्व करण्याची माझी इच्छाही नाहीं व प्रयोजनही नाही. जो देश नागमहाशयाच्या प्रकाशाने प्रकाशित झाला आहे, तेथे मी जाऊन आणखी जास्त काय बोलू?" तेव्हा तो भक्त म्हणाला "नागमहाशय तर अति गुप्त भावाने होते. जनात येऊन ते कधींही काही बोलले नाहींत." हे ऐकून स्वामी म्हणाले "तोंडाने काहीं बोलले नाहींत म्हणून काय झाले ? नागमहाशयासारख्या महापुरुषाच्या नुसत्या विचारतरंगानीं देशातील विचाराची गति बदलून जाते."

नागमहाशयाच्या पत्नीची बहीण श्रीमती हरकामिनी ही नागमहाशयाशिवाय अन्य कोणतीही देव देवता मानीत नसे तिची भक्ति व सरळ वृत्ति पाहून कोणालाही तिच्या बाबतीत आदर वाटत असे ती पतीसह पितृगृहीच असे नागमहाशयाचे तिच्यावर कन्येप्रमाणे प्रेम होते, व तिला भेटण्याकरिता ते कधी कधीं श्वशुरगृही जात श्रीमती हरकामिनीच्या घरी एक वार्षिक उत्सव होत असे. त्यादिवशी नागमहाशय तेथे आल्याशिवाय मूर्तीची प्राणप्रतिष्ठाही होत नसे व पुरोहित देखील पूजेला बसत नस. नागमहाशय पूजेला हजर असले म्हणजे प्रतिमेत देवीचा आविर्भाव होतो हे पुरोहिताला माहीत होते. एक वर्षी श्रीमती हरकामिनीच्या घरी एका केळीला चागला घड पडला होता फळाचा अग्रभाग नागमहाशयास द्यावयाचा असे तिने आपल्या मनाशी ठरविले होते. परतु त्यावेळी नागमहाशय कलकत्त्यास होते. इकडे केळी तर पिकून गेली व ते तोडण्याबद्दल नागमहाशयाची पत्नी तिला वरचेवर सागू लागली. ती म्हणाली "त्याना परत यावयास अजून एक महिना अवकाश आहे" तरी श्रीमती हरकामिनीने तिच्या बोलण्याकडे लक्षच दिले नाहीं. शेवटी नागमहाशयाच्या पत्नीने केळीचा घड एक दिवस कापून काढला. श्रीमती हरकामिनीने ताबडतोब त्यातील चागली केळी निवडून काढून नागमहाशयाकरिता ठेवून दिलीं व बाकीची वाटून टाकली. पुढे पधरा दिवसानीं नागमहाशय देशात आले तेव्हा श्रीमती हरकामिनी ती केळीं घेऊन त्याना भेटावयास गेली. केळीं बिलकूल

खराब झाली नव्हती ! नागमहाशयांनीं तिची भक्ति पाहून परम प्रीतीने काही केळी घेतलीं. ज्याचा नागमहाशयावर पूर्ण भरवसा असे अशा भक्तांनीं दिलेल्या वस्तूचा ते कधींही अव्हेर करीत नसत. देवभोग येथील एका भक्ताची त्याना मासे खाऊ घालण्याची इच्छा झाली. हे त्याच्या पत्नीस कळताच तिने त्याला त्याच्या विचारापासून परावृत्त करण्याची शिकस्त केली, पण भक्ताने काहींही न ऐकता बाजारातून एक मोठा रुईजातीचा ३-४ शेर वजनाचा मासा विकत आणिला. नागमहाशयाची पत्नी त्या माशाला स्पर्श न करता त्या भक्ताला म्हणाली "बाबा! आज काय प्रसग ओढवणार आहे कोण जाणे !" भक्त म्हणाला "तुम्हीं तयार तर करा, पाहू ते खातात कीं नाहीं ते" त्यावेळीं नागमहाशय घरीं नसून दूध आणण्या करिता गवळ्याकडे गेले होते. ते परत आले तेव्हा त्याच्या पत्नीने सर्व वृत्तान्त निवेदन केला त्यानी तो सर्व ऐकून घेतला पण त्यासबधी चागला अगर वाईट काहींच उद्गार त्यानीं काढला नाही म्हणून त्याच्या पत्नीनें मासा तयार केला आपण जेवावयास बसल्यास, नागमहाशय मासा खाणार नाहीत, या भीतीने भक्त जेवण्यास बसलाच नाही. शेवटीं मासा खाण्याचे कबूल करून नागमहाशयांनीं प्रथम त्या भक्ताला जेवावयास बसविले श्रीमती हरकामिनी ससारधर्माच्या बाबतीत अगदी उदासीन होती. रोग, शोक, सुख, दु:ख यानीं कधीही ती विचलित होत नसे. नागमहाशयाच्या भक्तवर्गाला ती आपल्यापैकीच समजत असे. नागमहाशय आपल्या सासूच्या भक्ती-भावाची फार प्रशसा करीत. एकदा ती कलकत्त्यास आली असता नागमहाशय तेथेच होते, त्याच्याकडे कुमारटुलींतील घरात ती उतरली. ती नित्य प्रातःकाळीं गगास्नान करून नदीच्या तीरावर येऊन पार्थिव लिंगपूजा करी. एक दिवस पूजा करीत असता शिवलिंगाचा अग्रभाग तिच्या हातून मोडला. शिवलिंग विदीर्ण होणे हे मोठे अमगलसूचक म्हणून तिच्या हृदयाचा थरकाप झाला व ती गगातटाकीं बसून व्याकुल चित्ताने रडू लागली. सध्याकाळ होत आली, तरी सासू परत आली नाहीं असे पाहून नागमहाशय तिला शोधण्यास निघाले, तो ती एकटीच गगेच्या तीरावर रडत बसलेली त्याना दिसली

तिने सकाळीं घडलेला वृत्तान्त नागमहाशयास सांगितला. तेव्हां नागमहाशय तिला न भिण्यास सांगून घरी घेऊन आले. घरी आल्यावर म्हातारी लेप पांघरून पडून राहिली. त्या दिवशीं तिने तोंडांत पाणीही घातलें नाहीं. रात्री तिला असें स्वप्न पडलें की, "वृषभ वाहनावर आरूढ होऊन महादेव तिच्या समोर उभे राहून म्हणाले की, "मी तुझ्या भक्तीने प्रसन्न झालो आहे. तुला आता पूजा करण्याची जरूरी नाही." वरील प्रमाणे स्वप्न पडल्यानंतर म्हातारीला मुळींच झोंप आली नाही प्रातःकाळ होतांच तिने उठून आपले स्वप्न नागमहाशयास सांगितले व तेव्हांपासून तिची शिवपूजा बंद झाली. कोणी त्या बाबतींत तिला विचारलें असता ती म्हणत असे कीं "शिवच प्रत्यक्ष जर मला जामात मिळाला आहे, तर मग शिवाच्या पूजेची काय जरूर?" नागमहाशयाची सासू त्यांना लांबून नमस्कार करी व जवळ येऊन ओढणी ओढून बसून राही वृद्धेचें हल्ली नव्वद वर्षांचे वय झालें आहे. ती आतां फक्त जप ध्यान यांतच दिवस घालवीत असते.

मी एक वेळ वार्षिक उत्सवाच्या वेळीं नागमहाशयाबरोबर त्यांच्या श्वशुरगृही गेलों होतों, त्या वेळीं नागमहाशयाच्या सासूची आई देखील जिवंत होती. तिला मी गीतेचे बरेच अध्याय वाचून दाखविले

नागमहाशय विवाहानंतर पहिल्या पहिल्याने सासुरवाडीला खाणें पिणें करीत श्रीरामकृष्णाचा आश्रय ग्रहण केल्यापासून त्यांनी तेथें कधीं पाणीही घेतलें नाही. याबद्दल त्यांची सासू कधीं कधीं विषाद दर्शवीत असे नागमहाशयाचें हल्लीं कोणी नांव घेतलें कीं वृद्धा म्हणत असते, "हाय हाय, माझा शिव जामात लीला पूर्ण करून निघून गेला. मी महापातकी म्हणून अजूनही जिवंत राहिले आहे."

नागमहाशयाच्या पित्याच्या श्राद्धाच्या वेळेला ज्या एका वृद्ध ब्राह्मणीने कर्जाऊ पैसे दिले होते, तीही त्यांची एक परम भक्त होती ही म्हातारी त्यांच्या शेजारच्या चौधरी बाबूची कन्या होती तिला पुत्र संतान वगैरे कांही नव्हते व ती कानानें जरा बहिरी होती तिच्या मनांतलें सर्व प्रेम माया नागमहाशय व त्यांची पत्नी यांच्याच वांट्यास आलें.

ती नागमहाशयास दुर्गाचरण व त्यांच्या पत्नीला सुनबाई या नावानी हाक मारीत असे. नागमहाशय त्या म्हातारीला जननीप्रमाणे मान देत व संसारातील सर्व कार्यांत तिची सल्ला मसलत घेत. त्या वृद्धेला सर्व लोक कृपण म्हणत. तिच्या जवळ पुष्कळ द्रव्यसंचय होता. नागमहाशयाच्या संसाराची ओढाताण पाहून तिला फार इच्छा होई की आपण त्याना काहीं तरी दान द्यावे, पण तिची ती इच्छा कधीही पूर्ण झाली नाही. फारच अडचण असल्यास नागमहाशय तिच्यापासून कर्ज घेत, पण हातात पैसा येताच लागलीच तिचे कर्ज फेडून टाकीत. नागमहाशयाकडे पुष्कळ लोक येत व त्यांच्या पत्नीला फार श्रम करावे लागत हे पाहून ती व्यथित चित्ताने म्हणे, "माझी सून कष्ट करता करता मरण्याच्या पथाला लागली आहे."

चौधरीच्या घरावरून नागमहाशयाच्या घरी येण्याचा रस्ता होता. त्या रस्त्यावरून कोणी नागमहाशयाकडे जाताना तिला दिसले म्हणजे ती म्हणत असे-" हे लोक पहा, साधूच्या दर्शनाला चालले आहेत !" म्हातारी नागमहाशयाना महापुरुष गणून त्याप्रमाणे भक्तीही करीत असे

नागमहाशयाच्या स्त्री भक्तांत श्रीयुत हरप्रसन्न यांची पत्नी मुख्य होती. तिच्या एका पत्रातील उतारा मागे पहिल्या प्रकरणात दिला आहे. इच्यासंबधाने मला स्वामी विवेकानंद एकदा म्हणाले " तुझ्या पूर्व बंगाल्यात एक स्त्री माझ्या पहाण्यात आली. ती जशी विद्वान् तशीच भक्तीमानही आहे " नागमहाशय तिला 'आई' म्हणून हाक मारीत व एखाद्या लहान मुलाप्रमाणे तिच्या हाताने खाण्याचे पदार्थ खात. कुमारटुली येथील पालबाबूंची जन्मभूमि भोगेश्वर येथे एकदा पटकीचा रोग सुरू झाला असता पालबाबूंनी नागमहाशयास तेथे नेले. नागमहाशय तेथे जाऊन पोहोचताच रोगाची साथ बंद झाली बाबू हरलाल पाल म्हणतात " जेव्हा आमच्या गावात महामारीची साथ सुरू होई, तेव्हा आम्ही नागमहाशयास तेथे घेऊन गेलो की साथ बंद होत असे." भोगेश्वर येथे जात असतां नागमहाशय हरप्रसन्न बाबूंच्या पत्नीला भेटण्याकरिता म्हणून तिच्या गावीं गेले. नागमहाशयास तिने पूर्वी कधीं पाहिले नव्हते, परंतु

आपला पति एका सत्पुरुषाकडे जात असतो एवढेच ऐकिले होते. नागमहाशय यास पहाताच तिच्या मनात आले की हेच ते साधू असावेत. नागमहाशयास काही खाऊ घालण्याची तिची फारच इच्छा होती. पण तिला अशौच असल्यामुळे तिचा इलाज नव्हता पण नागमहाशय यानी तिला अशौच आहे, तिच्या हातचें अन्न कसे खावे, वगैरे विचार न करिता तिचे हातचे सर्व अन्न मोठ्या प्रेमाने भक्षण केले तिचे नेसण्याचे वस्त्र अगदी फाटले आहे असे त्याच्या नजरेस पडताच त्यानी बाजारातून तिला २ वस्त्रे आणून दिली कोणी हरप्रसन्न बाबूला 'तुम्हाला अशौच असून तुमच्या घरचे अन्न नागमहाशयानी कसे भक्षण केले' म्हणून विचारले असता, ते म्हणत " बंधूनो ! माझे भाग्य थोर, आमच्या उद्धाराकरिताच त्यानी नरजन्म धारण केला आहे, व त्याच्याच कृपेने आम्ही या जन्मीच भवसागर पार होऊ."

लेखकाची जन्मभूमि भोगेश्वर येथून दीड कोस लाब आहे. मी त्या वेळी गावीच होतो. नागमहाशय भोगेश्वर येथे आले आहेत, असे कळताच मी त्याना भेटावयास गेलो मला पहाताच नागमहाशय म्हणाले " काय करू ? पालबाबू आमचे अन्नदाते आहेत याची गोष्ट न ऐकून कसे चालेल ? म्हणून त्याचे आमत्रण येताच येथे यावे लागले." दुपारी मी त्याना आपल्या गावीं घेऊन गेलो आमची कुलस्वामिनी देवी कात्यायनी इला पाहून त्याना फारच आनद झाला. त्यानी माझ्या पित्याला साष्टाग नमस्कार केला आमच्या घरीही त्यानी अन्न घेऊन आम्हाला कृतार्थ केले दुसऱ्या दिवशीं त्याच्याबरोबर मी भोगेश्वर येथे जात असताना रस्त्यात एक तर्करत्न पदवीधारी पडीत मला म्हणाले " या वेड्या माणसाबरोबर तुम्ही कुठे चाललात?" मी उत्तर दिले " हे वेडे आहेत खरे, पण तुम्ही आम्ही कामिनी काचनाने वेडे झालो आहोत, व हे ईश्वरप्रेमाने वेडे झाले आहेत, इतकेच."

हरप्रसन्न बाबूची पत्नी कधी कधीं देवभोग येथे येऊन रहात असे. ज्या वेळीं ती देवभोग येथून डाका येथे जाई, त्या वेळी नागमहाशय तिला लाबवर पोहोचविण्यास जात. एकदा ते असेच तिला पोहोचवि-

ण्यास जात असता लक्ष्मीनारायणाच्या मंदिराजवळ एक वृद्ध वैष्णवी त्यांना भेटली. वैष्णवी भिक्षा मागत हिंडत असल्यामुळे तिला सर्वजण ओळखीत. हरप्रसन्न बाबूंच्या पत्नीकडे बोट करून ती म्हणाली " ही तुमची कोण आहे? " नागमहाशयानीं उत्तर दिले " आई " वैष्णवीला नागमहाशय मातृहीन आहेत हे माहीत होते. ती म्हणाली " तुमची आई तर पुष्कळ दिवसापूर्वींच मरण पावली मग ही तुमची आई कशी ? " नागमहाशय म्हणाले ' हीच माझी खरी खरी आई आहे " तेव्हा भिकारणीला नागमहाशयाचा आशय समजला व ती म्हणाली " हा समजले हीच तुमची खरी आई असे जर नसते, तर बाबा तुमची साधू म्हणून कशाला कीर्ति झाली असती ? तुम्हाला देव उदंड आयुष्य देवो आणि तुमच्यामुळे देशाचें मुख उज्वल होवो ! " हरप्रसन्न बाबूंच्या पत्नीप्रमाणे स्त्रिया क्वचितच दिसून येतात देवभोग येथे तिची व माझी प्रथम गाठ पडली मीं तिला चांगले गाता येते असे ऐकिले होते म्हणून तिचे एकादे गाणे ऐकण्याची मी इच्छा दर्शविली तेव्हा तिने काहीही सबब न सांगता " मना आईचे चरण का सोडलेस ? " या अर्थाचे पद गाऊन दाखविले. सुंदर कंठ व त्यात तन्मयतेची भर पडलेली ! मी मुग्ध होऊन स्तब्धपणें पद ऐकत बसलो. तिची तन्मयता पाहून नागमहाशयही म्हणाले " जगदंबा स्वतःचे नामगान स्वत च करीत आहे" व "जगदंबा, स्वानंदे नृत्य करी, करताली देऊनिया" हे पद आपल्याशीं गुणगुणू लागले

नागमहाशय हरप्रसन्नाच्या पत्नीच्या बाबतीत म्हणत–" ही विद्यामाया आहे. देवी सरस्वतीच्या अंशाने जन्मली आहे." वरील मातृस्वरूपी मानसकन्येला नागमहाशयानीं आपल्या बाल्य कालातल्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या होत्या, त्यातील काही पहिल्या प्रकरणात दिलेल्याच आहेत. हरप्रसन्न बाबू, त्यांची पत्नी व पुत्र सर्वजण नागमहाशयाचे एकनिष्ठ भक्त होते.

नागमहाशयांची माता त्रिपुरासुंदरी हिची एक मावशी होती, तिचे नाव माधवी देवी असं होते. नागमहाशय तिला देवी माता म्हणून हाक मारीत असत. डाकाच्या जवळच कोणे एके गांवीं ती रहात असे.

पूर्व बंगाल्यात तिचे नाव अजूनही पुष्कळांच्या तोंडून ऐकू येते. माधवी देवी एकदा कलकत्त्यास आली असता तीन चार दिवस ती नागमहाशयांच्या घरी राहिली होती त्यावेळेस ती फक्त थोडे दूध व फळे खाऊन रहात असे. तिचे मुळी लग्नच झाले नव्हते. साधन, भजन व अतिथीसेवा याशिवाय तिला अन्य कोणचेच कार्य नव्हतें. नागमहाशय म्हणत " धर्माच्या बाबतींत इतकी उन्नत झालेली स्त्री अजून माझ्या पहाण्यात आली नाहीं " तिची जशी असामान्य त्यागवृत्ति होती तशीच सेवावृत्तीही असामान्य होती. नागमहाशय कधी कधी तिचे दर्शन घ्यावयास तिच्या घरी जात, व तीही नागमहाशयांच्या भेटीस देवभोग येथे येत असे माधवी देवी नागमहाशयांना " समुद्रातले रत्न' असे संबोधित असे श्रीयुत हरप्रसन्न मुजुमदार यांनी माधवी देवीचे विस्तृत चरित्र " उद्बोधन " मासिकात प्रकाशित केले आहे.

नागमहाशयांच्या ज्या भक्ताची मला माहिती आहे अथवा माधवी देवीप्रमाणे ज्याची माहिती मला विश्वसनीय गृहस्थाकडून कळली आहे, अशाचीच थोडी फार माहिती, प्रस्तुत पुस्तकात मी देत आहे.

देवभोगाच्या जवळ काशीपूर गावी एक मुसलमान रहात होता, त्याची नागमहाशयावर अतिशय श्रद्धा होती. त्याच्या बाबतींत नागमहाशय म्हणत " तो मुसलमान असला म्हणून काय झाले ? त्याच्यासारखा सात्विक भाव तर पुष्कळ ब्राह्मणाच्याही ठिकाणीं दिसून येत नाहीं. " त्या मुसलमानाचे वय ७० वर्षांचे होते तरुण वयात स्त्रीवियोग झाल्यावर पुन्हा विवाह न करिता सर्व प्रपंचाचा भार पुत्रावर टाकून तो स्वतः नेहमीं ईश्वरचिंतनात निमग्न राहू लागला. तो नित्य नागमहाशयाकडे येऊन त्यांना लांबूनच साष्टांग नमस्कार करीत असे. आपण हीन जातीचे आहोत म्हणून त्याने त्यांच्या घरात कधींच प्रवेश केला नाही याजबद्दल नागमहाशयास फार दुःख होत असे. मुसल्मानाने त्यांना नमस्कार केला असता नागमहाशयही त्याला उलट प्रणाम करीत असत व त्याबरोबर मोठ्या प्रेमाने गप्पा गोष्टी बोलत बसत. मुसलमान भक्त कोणतीही गोष्ट नागमहाशयाच्या सल्ल्याखेरीज करीत नसे. नागमहाश-

याचा उपदेश तो ईश्वराच्या आज्ञेप्रमाणे मानीत असे व त्याना प्रत्यक्ष पीर म्हणून मान देई या यवन साधूची नागमहाशयाची सेवा करण्याची फार इच्छा होती पण नागमहाशय त्याला उच्च दर्जाचा भक्त म्हणून कधी सेवा करू देत नसत.

सुरेशबाबू एकदा देवभोग येथे आले असता त्यानीं त्या यवन साधूला पाहिले होते. नागमहाशयानी त्याच्या बाबतीत सुरेशला म्हटले " ईश्वराच्या राज्यात जाती, वर्ण, पथ काहीही भेद नाही ईश्वराजवळ सर्व सारखे. जो ईश्वराला शरण येईल, कोणत्याही नावाने का होईना जो मनापासून त्याला हाक मारील, त्याच्यावर ईश्वर कृपा करीलच करील जगातलि नाना मतें, नाना पथ केवळ ईश्वराकडे जाण्याचे निरनिराळे रस्ते मात्र आहेत. मन सरळ असले व भाव दृढ असला म्हणजे कोणालाही ईश्वराचा लाभ करून घता येता."

नागमहाशयाच्या अपार कृपेमुळे ज्याचा आयुष्यक्रम पार बदलून गेला, अशामध्ये देवभोग येथील श्रीयुत काली कुमार भुईया हा मुख्य आहे. बाल्यकाळीं कालीकुमार अगदी दारिद्र्य दशेत होता. त्याची आई एका ब्राह्मणाच्या घरीं सेवा वृत्तीने रहात होती. त्या ब्राह्मणाच्या खटपटीने काली कुमार यास देवभोग येथील धनाढ्य गृहस्थ रतन बाबू यानी दत्तक घेतले. यौवनदशेत काली कुमार फार चचल स्वभावाचा असल्यामुळे त्याने सर्व सपत्ति उधळून टाकून तो भिकारी बनला. नागमहाशयाच्या सहवासानेही त्याचे यौवन दशेतील चाचल्य एकदम नाहींसे झाले नाहीं. म्हणून नागमहाशय प्रथम प्रथम त्याच्याकडे पहातही नसत. कालीकुमार आपले सर्व अपराध आठवून नेहमीं विषण्ण मनाने नागमहाशयाच्या घरी बसून रहात असे. एक दिवस काहीं गोष्टीवरून कालीकुमार नागमहाशयाच्या घराच्या एका खुटीवर आपले डोके आपटून घेताना मला दिसला. नागमहाशय त्याच्याकडे ढुकूनही न पहाता म्हणाले, " ज्याचे जसे कर्म असते तसेच फळ ईश्वर त्याला देतो." कालीकुमारावर दयादृष्टीनें पहाण्यास, मी नागमहाशयास विनविलें, पण ज्यानीं माझी कोणतीही प्रार्थना आजपर्यंत

अग्राह्य केली नाहीं, त्यानीं आज माझी प्रार्थना अमान्य केली. त्याचा असा कठोरभाव मीं पूर्वी कधीही पाहिला नव्हता. कालीकुमारचा व नागमहाशयाचा काही आप्तसंबंधही होता. काली कुमार नेहमी नागमहाशयाप्रमाणे हात जोडून राहत असे, व खालीं नजर देऊन नम्रपणे चालत असे. कालीकुमारच्या गळ्यात एक तुळशीची माळही असे. क्रमाक्रमाने त्याला पूर्ण उपरति झाली व तो पुढे वृंदावन येथे गेला तेथून परत आल्यावर मात्र नागमहाशय त्याच्याबरोबर प्रेमाने वागत. तो हल्लीही कधीं कधी तीर्थाटन करून नेहमी नागमहाशयाच्या पवित्र जीवनक्रमाचे वेदाप्रमाणे स्मरण व अनुकरण करून कालक्रमणा करीत आहे. नागमहाशयास देण्याकरिता म्हणून एक दिवस कालीकुमार पुष्कळसे सामान मजुराच्या डोक्यावर देऊन त्याच्या घरी आला. त्या दिवशी सुरेशबाबूही तेथच होते. नागमहाशयानी मोठ्या काकुळतीने विनती करून त्या सर्व वस्तू परत केल्या इतकेच नाही तर त्या दिवशी त्यालाच आपले घरी आमंत्रण देऊन सुरेशबरोबर भोजन घातले !

एकदा श्रीसत्यगोपाल डाका येथे कीर्तन करण्यास आले असता त्याच्या मुखाने नागमहाशयाची कीर्ति ऐकून मी व हरप्रसन्न त्याच्याच बरोबर देवभोग येथे नागमहाशयाच्या प्रथमच दर्शनास आलो, तोंच संध्याकाळ झाली. म्हणून त्यादिवशीं त्याच्याकडे दर्शनास गेलो नाही. दुसऱ्या दिवशीं सकाळी सत्यगोपाळच्या घरींच त्याचे कीर्तन सुरू झाले, तोंच एक व्यक्ति हीन दीन वेषाने तेथे येऊन साष्टांग नमस्कार घालून पडलेली आम्हाला दिसली. सत्यगोपालनेही उलट त्या व्यक्तीला साष्टांग नमस्कार केला. तेच नागमहाशय होत असे आम्हाला नंतर कळले. कीर्तन पुन्हा सुरू झाले. मध्ये मध्ये नागमहाशयाना भावावेश होत होता कीर्तन संपल्यावर “ जयरामकृष्ण ! जयरामकृष्ण !” म्हणत म्हणत ते आपल्या घराकडे वळले. हरप्रसन्नबाबू व मीही त्यांच्या मागोमाग त्याच्या घरी गेलो. तेव्हापासून सवडीनुसार मीही त्याच्याकडे जाऊ लागलो. श्रीयुत हरप्रसन्नबाबू डाका येथील जिल्हा कचेरींत नोकर होते. डाका येथून दर शनिवारी ते नागमहाशयाच्या

दर्शनास येत. पावसाळ्यांत सर्व देवभोग जलमय होत असे, म्हणून शनिवारी त्याच्याकरिता एक नौका घेऊन लक्ष्मीनारायणाच्या मंदिराजवळ नागमहाशय हजर रहात व हरप्रसन्नबाबू गाडीतून नारायणगज येथे येऊन पोहोचले म्हणजे त्याना नावेत बसवून नौका स्वतः चालवीत घरी घेऊन येत हरप्रसन्नबाबू त्याना नाव स्वतः न चालविण्याबद्दल नाना प्रकारे विनवीत पण ते ऐकत नसत, म्हणून हरप्रसन्न बाबू नावेत बसेनासे झाले शेवटी नाव चालविण्याकरिता त्यानी एक छोकरा ठेविला व तोच नेहमी त्याना शनिवारीं देवभोग येथे घेऊन येई, व सोमवारी नारायणगज येथे पोहोचवून देई. पुढे हरप्रसन्न बाबूची बदली नारायण-गज येथे झाली तेव्हा त देवभोग येथेंच रहात. डाक्याला त्याची पुन्हा बदली झाली तेव्हा पूर्वीप्रमाणे त्याचा दर्शनास येण्याचा क्रम सुरू झाला त्यानी नागमहाशयाचे शनिवारचें दर्शन कधीच चुकविले नाहीं पुढे काहीं दिवसानीं त्याचे एकाएकी डोके फिरल्यामुळे त्याना रजा घ्यावी लागली हरप्रसन्न बाबूची वृत्ति पाहून त्याची पत्नी खिन्न झाली व तिला फार चिंता वाटू लागली, म्हणून तिने त्याना नागमहाश-याच्या चरणाजवळ आणिले नागमहाशयाच्या आशीर्वादाने काही दिवसानतर हरप्रसन्न बाबूची पीडा नाहींशी झाली व ते पूर्वीप्रमाणे चागले बरे झाले भक्तामध्ये हरप्रसन्न बाबूच नागमहाशयाना विशेष प्रिय होते ब्रह्मलीन होण्यापूर्वी २—३ दिवस नागमहाशय हरप्रसन्नला म्हणाले " हे बघ, परमहसदेव खरोखरीच ईश्वरी अवतार होते." हरप्रसन्नच्या बाबतींत नागमहाशय नेहमी म्हणत, " हरप्रसन्नचा जसा वीरभाव आहे तशीच त्याची भक्तीही आहे. " पूज्यपाद स्वामी ब्रह्मानद देखील हरप्रसन्नाच्या भक्ती भावाने सतुष्ट झाले होते. नागमहाशयाचे आदर्शवत् जीवन हरप्रसन्न बाबूच्या ठिकाणी जसे पूर्णपणे प्रतिबिंबित झाले होते तसे इतरत्र कोठेही झाले नाही. हरप्रसन्नला पाहिले म्हणजे किंवा त्याच्या तोडचे " कृपा कृपा, आपली कृपा !" वगैरे शब्द ऐकिले म्हणजे नागमहाशयाचीच आठवण होते. त्याची लीनता, भक्तीभाव, प्रेमळपणा, सेवा वगैरे पाहूनही नागमहाश-

याचेच स्मरण होते. हरप्रसन्न बाल्यकालापासूनच देवद्विजभक्तिपरायण असत. त्यानी पुष्कळ पद्यरचना केली आहे, त्यातील ते कधीं कधीं भावावेशात असताना म्हणत असत

एकदा नागमहाशय आजारी असता हरप्रसन्नबाबू देवभोग येथे येऊन पोहोचले. आपल्या आजाराकडे दुर्लक्ष करून नागमहाशय तसेच बाजारात गेले, व चिंगडी जातीचे चागले चागले मासे त्याच्यासाठीं घेऊन आले. या त्याच्या करण्याने हरप्रसन्नबाबूना फार दु.ख झालें व त्यानीं "ते मासे तोंडात घालावयाचे नाहींत" असा निश्चय केला. नागमहाशयाच्या पत्नीने नागमहाशयास हे जाऊन सागितले, तेव्हा त्यानीं अथरुणावरून उठून स्वतः हरप्रसन्न बाबूला आपल्या हाताने मासे खाऊ घातले व म्हणाले "हे मासं खावयाला काहीं हरकत नाहीं ! खा पाहू ! "

नागमहाशय ब्रह्मलीन होण्यापूर्वी काही तास आधीं हरप्रसन्न बाबूनीं देवभोग गाव सोडिलें. कारण नागमहाशयाचा अतकाल पहाणे त्याच्या कोमल स्वभावाला अशक्य होते. जन्मभूमीचा त्याग करून हरप्रसन्न बाबू डाका येथे राहू लागले काहीं दिवस त्यानीं उतकल भागातही काम केले.

श्रीयुत नटवर मुखोपाध्याय नागमहाशयाच्या प्रयाण कालीं हजर होते. ते देवभोग येथेच रहात असल्यामुळे त्याना नित्य नागमहाशयाकडे येणे जाणे सुलभ होते. नटवर पूर्व वयात फार उछृखल होते, तरी त्याच्या अगी भक्तीबीज रुजलेले होते नागमहाशयास ते अवतार म्हणून मानीत असत. नागमहाशयाचे घर पितृश्राद्धसमयी त्यानीं गहाण ठेविले होते ते नागमहाशयाच्या पत्नीने, नटवर वगैरे भक्ताच्या सहाय्याने मोठ्या प्रयासाने सोडवून घेतले. नागमहाशयाच्या समाधीवर नटवराच्या प्रयत्नानेच एक घर बाधले गेले. त्यातच नागमहाशय वापरीत असलेल्या वस्तू नीट जपून ठेविल्या आहेत व त्याची रक्षा तेथेच जमिनीत पुरून ठेवली आहे. बेलूड मठाच्या पद्धतीवरच नटवरानीं नागमहाशयाच्या समाधीची पूजा, भोग, राग, आरती वगैरेचे नियम ठरविले आहेत. जे त्याना चागले असे वाटे, ते करण्यात सर्वस्व देण्याची जरी त्याच्यावर पाळी आली

तरी ते माघार घेत नसत. नटवरानी एक नाटक रचले आहे, त्यांत "भक्ताच्या रक्षणाकरिता व दुष्टाच्या दमनाकरिता ईश्वर अवतार धारण करितो" हें तत्त्व ग्रथित केले आहे. देवभोग येथे वरील नाटकाचा प्रयोग झाला असता नागमहाशय देखील ते नाटक पाहावयास गेले होते. नटवर याने या नाटकात विशेषेकरून नागमहाशयाची भूतमात्रावरील अपार दया व त्याचा असाधारण नम्रपणा याचें वर्णन केलें आहे. नागमहाशय नेहमीं नटवराना शास्त्रग्रथ वाचण्याचा उपदेश करीत असत. गुरूच्या कृपेनें शास्त्राचे मर्म विवरण करून सागण्यात त्याची प्रतिभा चागलीच दिसून येत असे. परतु ते नागमहाशयाखेरीज कोणालाही मानीत नसत. मध्यें मध्ये नटवर चाकरी करीत, परतु बहुतेक नेहमीं ईश्वराला आत्मसमर्पण करून निश्चिंत मनाने रहात. पुष्कळ काळ ते देवभोग येथेच घालवीत. नागमहाशयाची पत्नी नटवराचे मत घेतल्याशिवाय कोणतच कार्य करीत नसे. व नटवरही तिची नेहमीं काळजी घेत. नटवराच्या प्रयत्नानें तिच्या श्री वृदावन, काशी वगैरे ठिकाणच्या यात्रा झाल्या होत्या. नागमहाशयाचे भक्तगण नटवरला फार प्रिय असत नटवर कलकत्त्यास कधीं आले असता श्रीरामकृष्णभक्तगणाची पदधूली घेत असत. परतु सुखदुःख वगैरे सर्व अवस्थात एका नागमहाशयावर मात्र त्याचा भार असे. ज्याने नागमहाशयाच्या स्मृतिरक्षणार्थ आपला देहही वेचला, तो अर्थातच वद्य होय.

नागमहाशयाचे आणखी एक भक्त श्रीयुत अन्नदा हे सर्व श्रीरामकृष्ण भक्तास परिचित होते ते काही शिकले सवरलेले नव्हते, पण भक्ती विश्वासाच्या बाबतींत ते वीर पुरुष होते मुन्सी गजाच्या जवळ एका गावात त्याचा जन्म झाला. अन्नदाबाबू वेळ सापडताच नागमहाशयाकडे येत. या बाबतींत घरच्या माणसाचे त्यांनीं कधींच ऐकले नाहीं. त्यांच्या मनात जे कार्य करावयाचे असे, ते पूर्ण झाल्याशिवाय ते स्वस्थ असत नसत. काम करण्यांत त्याना कधीं आळस नसे. परहिताकरिता प्राण देण्यासही ते सदा तयार असत. नागमहाशय त्यांच्या अखड उद्योग, साहस, निष्काम भक्ति व सरळ विश्वास याची नेहमी प्रशसा करीत. या

मद बुद्धीच्या ब्राह्मणावर त्याची अपार कृपा असे. हरप्रसन्न बाबू जेव्हा डाका येथे होते तेव्हा अन्नदाबाबू त्याच्या येथे काहीं दिवस राहिले होते. तेथील डेप्युटीची व आन्नदाबाबूंची ओळख झाली. मध्ये मध्ये ते डेप्युटीच्या घरींही जात. त्यावेळीं पूज्यपाद स्वामी विवेकानद याचा यशोदुदुभि अमेरिकेहून सर्व ठिकाणीं गर्जत होता. स्वामीसबधानें पुष्कळ गोष्टी अन्नदा बाबूंनी नागमहाशयाच्या तोडून ऐकिल्या होत्या. एक दिवस अन्नदा बाबू डेप्युटीच्या घरीं गेले असता स्वामी विवेकानदासबधी गोष्टी निघाल्या. डेप्युटीने स्वामीजींवर टीका करणे सुरू केले अन्नदाबाबू शात स्वराने म्हणाले “ तुम्हीं डेप्युटी आहात म्हणून मी तुम्हाला प्रत्युत्तर करणार नाहीं, असे समजू नका.” नागमहाशय ज्याची नेहमी प्रशसा करीत, ज्यानीं आपल्या तपस्या बलाने व विद्या बलाने अमेरिकेत प्रचड खळबळ माजवून दिली व ज्याच्या गौरवाने हे भारत वर्षसुद्धा गौरविले गेलें, अशा महात्म्याची उगीच निंदा करून पापाचे धनी का होता ?” अन्नदाच्या म्हणण्याकडे लक्ष न देता डेप्युटी पुनः टीका करू लागले. तेव्हा अन्नदाबाबू त्याच्यापुढे येऊन उग्र स्वराने म्हणाले “ One word more against Swamiji, and you are done for !” ( स्वामींच्या विरुद्ध आणखी एक शब्द जर तोडाबाहेर काढलात तर तुमचें आयुष्य सरलेच असे समजा.” अन्नदा बाबूची उग्रमूर्ति पहाताच डेप्युटीचे तोड पाढरें पडले, व त-त-करीत ते म्हणाले “ अरे मीं थट्टा केली म्हणून का इतके रागवावे ?” त्याला काहींही प्रत्युत्तर न करिता अन्नदा बाबू तेथून उठून गेले, व आमरण त्यानीं त्या डेप्युटीचे कधींही मुखावलोकन केले नाहीं.

नागमहाशयाचा अतिम काल जवळ आला असता अन्नदाबाबू त्यांच्या प्राणाची भिक्षा मागण्याकरिता माताजीकडे ( श्रीरामकृष्णपत्नी ) गेले होते. माताजी त्या वेळीं जयरामवाटी येथे रहात होत्या. तारकेश्वराहून अन्नदाबाबू पायीं जयरामवाटी येथे गेलें. तेथून परत तारकेश्वरीं येऊन कलकत्त्यास गिरीशला भेटावयास गेले. कलकत्त्याहून अन्नदाबाबू देवभोग येथे आले, तों नागमहाशय ब्रह्मलीन झालेले होते. नागमहाशयाच्या

अतीम काळीं आपण त्याना भेटू शकलों नाहीं म्हणून अन्नदाबाबू स्वतःचा धिःकार करीत अन्नदाबाबूचा आपल्या धाकट्या भावावर अतिशय राग असे. तो त्याच्या अगदीं उलट स्वभावाचा होता. अन्नदाबाबू विशेषसे आचारनिष्ठ नव्हते त्यांना काहीं लिहिणें टिपणे देखील येत नव्हते. त्याचा भाऊ विद्वान् व आचारनिष्ठ होता पण तो अगदीं भक्तीभावहीन असे. अन्नदाबाबू नेहमीं नागमहाशयास म्हणत, "जेणेंकरून याची श्री रामकृष्णपदीं भक्ति जडेल असा याला आशिर्वाद द्या." नागमहाशय आसन्नमरण असता एक दिवस अन्नदाबाबूचा भाऊ त्याच्याकडे आला होता व रात्रीं त्यानें 'ईशोपनिषद्' नागमहाशयाना व आम्हाला ऐकविले. तोच पुन्हा एकदा बेलूठ मठातही गेला होता, पण त्याच्या गर्विष्ठ स्वभावामुळे त्याच्यावर साधूकृपा झाली नाहीं. अन्नदाबाबू भावाच्या बाबतीत नेहमीं म्हणत की "त्याला आपल्या आयुष्यास फार दुःखे भोगावी लागतील." व त्याप्रमाणे शेवटीं तसेच झालें. नागमहाशय ब्रह्मलीन झाल्यावर ९ वर्षांनीं अन्नदाबाबू आमाशाने मरण पावले. मरणाच्या वेळी त्याना नागमहाशयाच्या भक्तगणाच्या दर्शनाची इच्छा झाली. हे हरप्रसन्नबास कळताच ते त्याच्याकडे गेले. हरप्रसन्नला पाहून मोठ्या आल्हादाने अन्नदाबाबू म्हणाले "दादा, शरीर जायला आता काहीं वेळ नाही, 'पुन्हा देह धारण करून श्रीरामकृष्णाच्या कार्याला ये,' असा मला आशीर्वाद दे." असे म्हणून सद्गद कठाने श्रीरामकृष्ण व नागमहाशय याचे नामस्मरण करीत असता त्याची प्राणज्योत मालवली. हरप्रसन्न बाबूची ओढ्या प्रातातील नोकरी केवळ अन्नदाबाबूकरिता होती. नागमहाशयाच्या भक्तांकरिता हरप्रसन्न नेहमीं जीवाची आहुतीही देण्यास तयार असत.

श्रीमती हरकामिनीचे पति श्रीयुत कैलासचद्र दास आपल्या पत्नीप्रमाणेच ससारातील सर्व सुखदुःखाच्या प्रसगीं नागमहाशयावर भार ठेऊन निश्चिंत असत. कैलासबाबू नागमहाशयाच्या ससाराचे एक रक्षकच होते बाजार हाट, घराची दुरुस्ती, गरजेनुसार कर्ज काढून ससार चालविणे, या सर्व कामीं नागमहाशयाच्या पत्नीला कैलासबाबूचीच मदत असे.

कैलासबाबू वीरभावाचे साधक होते, व म्हणून ते मध्ये मध्यें मद्याचेंही ग्रहण करीत. कधीं कधीं तें मद्यपान मर्यादेच्या बाहेरही जाई. नागमहाशयानीं त्याना यापासून निवृत्त करण्याची पुष्कळ खटपट केली. कैलास बाबूचें मद्यपानाचे व्यसन नाहींसें करण्याकरिता म्हणून नागमहाशयानीं एक दिवस स्वतः मद्य विकत आणून तें पुनः पुनः त्याला पाजलें. त्या दिवसापासून कैलासबाबूनीं आमरण मद्याला स्पर्श केला नाहीं. नागमहाशय कोणाकडून काहींही घेत नसत, पण कैलासबाबूपुढे त्याचें काहींही चालत नसे नागमहाशयास धाक दाखवून ते आपल्या इच्छेनुरूप त्यास जेवण खाण घालीत. कैलासबाबूचा धाक नाहीं असा एकही मनुष्य देवभोग येथें नव्हता. सर्व प्रकारच्या कपटाचाराचा कैलासबाबू मोठा तिरस्कार करीत. ते म्हणत "जेथें अतर्यामी भगवान् प्रत्यक्ष सर्व पाहतो आहे, तेथे आणखी दुसऱ्याशीं फसवाफसवी कशी करावी ?" जे नागमहाशय जगातील सर्व चराचराशीं सेव्य सेवक भावानें वागत असत त्याच्याशीं कैलासबाबूही तसेच आचरण करीत. नागमहाशयाची आज्ञा पालन करणे, हेंच कैलास बाबूचें मुख्य व्रत होतें.

श्रीयुत पार्वतीचरण मित्र हा नात्यानें नागमहाशयाचा जावाई होता. मुनशीगज येथील वकील बाबू राजकुमार नाग याची कन्या श्रीमती विनोदिनी इच्याशीं पार्वतीचरणाचा विवाह झाला होता. नागमहाशयाच्या कृपेने या दापत्याची अध्यात्मिक उन्नति बरीच झाली होती. या दापत्याला नागमहाशय नेहमीं लक्ष्मीनारायण म्हणत. हे उभयता नागमहाशयाना 'ईश्वरी अतवार' असें म्हणत. भगिनी विनोदिनीला नागमहाशयाच्या कृपेने अनेक प्रकारचीं अलौकिक दर्शनें घडलीं होतीं. पार्वतीबाबू अजूनही नागमहाशयाच्या पत्नीकडे दर महिन्यास काहीं रक्कम मदत म्हणून पाठवीत असतात.

नागमहाशयाच्या शेवटच्या दिवसात राजकुमार बाबू नागमहाशयाकडे वरचेवर येत, व हल्लींही ते आपल्यापुढे नागमहाशयाचाच आदर्श ठेऊन आपली अध्यात्मिक उन्नति करून घेत आहेत. राजकुमार, नागमहाशयाच्या बऱ्याच अलौकिक गोष्टी सागत असतात. त्यातील एक

खालीं दिली आहे. " ज्या दिवशी नागमहाशयाच्या घरी गगेचा प्रवाह निघाला, त्या दिवशी एक दोघा भक्तांना तेथे काली घाटावरील देवी प्रगट झालेली दिसली व कालीघाटही दिसू लागला, व तेथे स्नान करीत असलेलीं सर्व माणसे जणू काय कालीघाटावरच स्नानें करीत आहेत, असे त्याना वाटले." तसेच प्रस्तुत लेखकाला ते एकदा म्हणाले—"नाग-महाशय दीनदयाळच्या मरणापूर्वी म्हणाले कीं, ' जर बाबाच्या अतकाळच्या वेदना मला डोळ्यानी पहाव्या लागल्या,तर या जन्मात केलेले धर्म कर्म फुकटच झाले म्हणावयाचे. हे भगवान् श्रीरामकृष्ण! बाबाना शातपणे मरण येईल असे करून, आपले पतितपावन नाम सार्थ करा." इत्यादि.

पार्वतीचरण एकातप्रिय असत. ते धर्मासबधीं कधींही तर्क वितर्क करीत नसत. नागमहाशयाना महापुरुष जाणून त्यानीं त्याच्या चरणीं आपला देह अर्पण केला होता. आम्हीं जेव्हा निरर्थक गप्पा गोष्टी करीत असू, तेव्हा पार्वतीबाबू शातपणे बसून आपल्या इष्ट देवतेच्या चितनात मग्न असावयाचे. नागमहाशयाजवळ त्यानी कधींही काही मागितले नाही. त्याचा दृढविश्वास होता कीं, नागमहाशय सर्वज्ञ आहेत. आपल्याला जे लागेल ते सर्व ते आपण होऊन आपल्याला देतील. नाग-महाशयाच्या अतकालीं पार्वतीबाबू देवभोग येथे होते. नागमहाशयाच्या स्मृतिरक्षणाच्या कामीं त्यानी मुक्तहस्ताने मदत केली आहे. नागमहाशयाच्या पत्नीवरही त्याची अचल भक्ति होती.

नागमहाशयाचे शेजारी श्रीयुत जगद्बधु भुइया हे नेहमीं नागमशयां-कडे येऊन भागवत वगैरे ग्रथ वाचीत असत, व भक्ताबरोबर नामसकीर्तनही करीत. त्यांच्या दीन भावाची व भक्तीची नागमहाशय नेहमी प्रशसा करीत. जगद्बधूवर त्याचा फार लोभ होता. नागमहाशय स्वतः कदील घेऊन त्याना त्याच्या घरीं पोहोचवून येत. जगद्बधु हल्लीं देवभोग सोडून दुसरीकडे राहतात व कधी कधीं देवभोग येथे येऊन नागमहाशयांच्या समाधीचे दर्शन घेऊन जातात.

नागमहाशयाचे बालपणचे मित्र श्रीयुत कामिनीकुमार मुखोपाध्याय हे देवभोग येथील सर्वश्रेष्ठ पूज्य गृहस्थ होते. कामिनीकुमार बाबू

नेहमीं गभीर असत. नागमहाशयावरील आपली भक्ति त्यानी मुखानें कधींही उच्चारून दाखविली नाहीं. फक्त एकदा ते म्हणाले " नागमहाशयासारख्या महापुरुषाच्या जन्माने देवभोगग्राम धन्य झाले आहे." कामिनी बाबूचा पिता व नागमहाशयाचा पिता याची दाट मैत्री असल्यामुळे, सहजच त्याच्या पुत्राचीही दाट मैत्री जमली. कामिनीबाबू नागमहाशयाच्या घरीं आले म्हणजे फारसे बोलत नसत स्वस्थ बसल्या बसल्या तबाखू सेवन करीत व मध्ये मध्ये नागमहाशयाच्या मुखाकडे पहात असत. मी नागमहाशयाचा भक्त म्हणून कामिनीबाबू व त्याचे वडील माझ्यावर फार प्रेम करीत, व मला आपल्या घरी नेहमी प्रेमानें जेवावयास बोलवीत एक दिवस कामिनीबाबू नागमहाशयाच्या जवळ बसून एक गाणे गात होते. कामिनीबाबूची ती तन्मयता मला अजूनही आठवते. त्याचा तो त्या दिवशीचा आवाजही कानात अजून घुमत आहे. नागमहाशय एकादे भावयुक्त गाणे ऐकताच तन्मय होऊन जात. एक दिवस त्याचा भक्त एक असेच गाणे म्हणत असता नागमहाशयाचा भावसमाधि लागला. समाधिभगानतर त्या भक्तासाठी चिलीम भरीत असता ते म्हणाले " प्रत्यक्ष जगदबा आपले गाणे ऐकत या घरात उभी असलेली मला दिसली. याच जन्मात जगदबा आपल्यावर कृपा करील." आणखी एक दिवस तोच भक्त नागमहाशयाजवळ बसून जगदबेचे पद म्हणत होता. नागमहाशय "जय जगदबे ! आनदमयी !" म्हणून चुटक्या वाजवू लागले. काही वेळाने केवळ " जगदबेचे वदन पाहता दुःख अहा सपले, माझिया अत.करणातले." एवढेच चरण घोळून घोळून म्हणू लागले. भक्ताला वाटले खरोखर या वेळी ते जगदबेचे प्रत्यक्ष दर्शन घेत असावे. नतर भावावेशात पुन्हा " प्रसाद बोले जगदबेचे नाम स्मरता मुखे, सर्वेही यात्रा घडल्या सुखे." एकसारखे एवढेच गाऊ लागले. हजर असलेल्या भक्ताने त्याची ही स्थिति त्याच्या पत्नीस निवेदन केली असता, ती म्हणाली " बाबा साधनभजनाची तर गोष्टच राहू दे, त्यानी मनात आणिल्यास त्याना वाटेल त्या देवदेवींचे दर्शन होतें. त्यानीं स्वतःच ही गोष्ट मला कितीदा तरी सागितली आहे."

एका प्रकारे, देवभोग येथील आबालवृद्ध सर्व लोकच नागमहाशयाचे भक्त होते, असे म्हटले तरी चालेल. सर्वजण नेहमीं त्याच्या दर्शनास येत, त्यात श्रीयुत सत्यगोपालचा धाकटा बधु महिमाचरण व नकडी दत्त हे प्रमुख होते.

नागमहाशयाच्या पुरोहिताचा मुलगा अश्विनी चक्रवर्ती हा पुष्कळ वेळा नागमहाशयाकडे येऊन शास्त्रचर्चेत व भक्तीचर्चेत रात्रीच्या रात्री घालवी अश्विनीबाबूना कीर्तनाची विशेष आवड असे. कीर्तन करता करता हरीप्रेमाने उन्मत्त होऊन ते नाचू लागत नागमहाशयाच्या समाधीची पूजा अर्चा वगैरे कर्म हेच करीत असतात

नागमहाशयाचे शेजारीं गोपालचद्र चक्रवर्ती हे त्याचे पहिले भक्त. नागमहाशयाचा परिचय इतर भक्ताना त्याच्या योगानेच झाला, म्हणून ते सर्व त्याना फार मान देतात गोपाळचद्र नारायणगज येथे तागाचा व्यापार करीत व फुरसत मिळताच साधनभजनात कालक्षेप करीत यांनी पहिल्याने एका स्त्रीगुरूजवळ दीक्षा घेऊन मधुर भावाचे साधन केले. त्या साधनाच्या योगाने त्याच्या अगीं विलक्षण आकर्षणशक्ति आली होती भक्तसमाजात हे सत्यगोपाल या नावाने परिचित आहेत. सत्यगोपाल मृदग फार चागला वाजवीत ते नेहमी कीर्तन करीत फिरत असत. त्याच्या कीर्तनात विलक्षण आकर्षणशक्ति होती, त्यामुळे पाषाण-हृदयी मनुष्यही त्याचे कीर्तन ऐकून अगदी द्रवून जात. सत्यगोपाल एक-सारखे तीन वर्षे नागमहाशयाच्या सहवासात होते, व त्याच्याच कृपेमुळे त्याच्या स्वभावात परिवर्तन झाले पुढे त्यानीं वैष्णवतत्राचे वामाचार साधन सोडून भक्ती मार्गाचा स्वीकार केला. नागमहाशयाचे त्याचेवर विशेष प्रेम होते. कधीं कधीं नागमहाशय त्याना बरोबर निबिड अरण्यात जाऊन साधन भजन करीत. नागमहाशय त्याच्याबाबतींत म्हणत "याची श्रद्धा दाडगी आहे, अनुरागही प्रचड आहे, परतु भोगवासना अजून पूर्ण नाहींशी झाली नाहीं." सत्यगोपाल नागमहाशयास मनातल्या मनात गुरु म्हणून मानीत असत. नागमहाशयास कोणीही गुरु म्हटलेले आवडत नसे, म्हणून त्यानीं मुखाने तसे कधीं म्हटले नाहीं. नागमहाशयांसबधीं सत्य-

गोपाल म्हणत “ ते मूर्तिमत वेद होते. त्याचे स्वरूप आकाशाप्रमाणे विस्तृत होते. ” म्हणून ते नेहमी “ श्रीगुरु वेदाकाशकी जय !” म्हणून नागमहाशयाचा जयघोष करीत नागमहाशयाच्या कृपेने भक्तसमाजात त्याना मोठा मान होता. नारायणगजजवळ असलेल्या धर्मगज गावीं त्यानीं आश्रम स्थापन करून आयुष्याची शेवटची तीन वर्षे तेथे घालविली. पाठीवर हाड्याव्रण होऊन ते काही दिवसापूर्वी मरण पावले त्याचा शिष्यसमुदाय मोठा होता.

एके वेळीं सत्यगोपाळने नागमहाशयाकरिता काहीं आंबे पाठविले त्या वेळेस नागमहाशय घरीं नव्हते त्याच्या पत्नीने आंबे घेऊन येणाऱ्या माणसाला ते परत नेण्यास सागितले, पण त्याने न ऐकता आंबे दरवाज्यात टाकून रस्ता धरला. नागमहाशय येताच त्याना सर्व हकीगत समजली. त्या वेळेला पावसाळा असल्यामुळे या घरून त्या घरी जावयास नौका लागत असे. नागमहाशयास नौका सापडेना. शेवटी त्यानीं सत्यगोपालच्या घरीं पोहत जाऊन त्याचे आंबे त्यास परत देऊन टाकले।

---

# प्रकरण आठवें.



## महासमाधि

इसवी सन १९०० सालीं नागमहाशय नित्य क्रमाप्रमाणे वार्षिक पूजेचा बाजार करण्यास आले नाहीत, व मीही त्या वर्षी कार्यबाहुल्यामुळे देवभोग येथे जाऊ शकलो नाहीं आश्विन कार्तिक दोन महिने निघून गेले एक दिवस–“ ताबडतोब निघून या ”–अशा अर्थाची नागमहाशयाच्या पत्नीची तार माझ्या हातात पडली. दुसऱ्या दिवशी रविवार होता त्या दिवशीं मला “ रामकृष्ण मिशन ” तर्फे भरणाऱ्या सभेत ‘ वेदाचा धर्म ’ या विषयावर निबंध वाचावयाचा होता. समाजकार्य सोडून जावे कसे

अशा किंकर्तव्यमूढ स्थितींत मी विचार करीत असता, स्वामी अद्भुतानंद माझ्या घरीं आले. आलेली तार पाहून स्वामी म्हणाले, " वेदावर व्याख्याने देण्यास आयुष्यात पुष्कळ काळ सापडेल, पण नागमहाशय या आजारात ब्रह्मलीन झाल्यास, त्या देवदुर्लभ महापुरुषाचे दर्शन मात्र पुन्हा घडणे शक्य नाही. हे ऐकताच मीं त्याच दिवशीं देवभोग येथे जाण्याचे ठरविले. श्रीरामकृष्णभक्त हरमोहन यानीं काहीं पैशाची मदत केली, त्या पैशातून पाने, फळे, बेदाणा आणि आजारी माणसास लागणारे सामान घेऊन रात्रीच्या गाडीने निघालो, तो दुसऱ्या दिवशी सध्याकाळच्या आत देवभोगास पोहोचलो.

घरात जाऊन पहातो तो, नागमहाशय पूर्वेकडील बाजूच्या पडवींत एका फाटक्या गोधडीवर पडून राहिले आहेत ! घरात लेप वगैरेचा अभाव होता असे नाहीं, पण ते कोणाचेच ऐकत ना. शीतकाल असल्यामुळे, अशा थड हवेत पडवीत निजणे रोग्याला तर राहोच, पण चागल्या निरोगी मनुष्याला सुद्धा अत्यत अनिष्ट त्याना या स्थितीत पाहून मी त्याच्या पत्नीच्या मुखाकडे पाहिले, तेव्हा ती अगदी हळू आवाजाने म्हणाली, " बाबा, ज्या दिवशी हे अथरुणावर पडले, त्या दिवसापासून त्यानी घरात पाऊलही टाकले नाही. तेथे पडवींतच या स्थितींत पडून आहेत. वार्षिक पूजेच्या पूर्वीं शूलवेदना वाढलीच होती, त्यात आणखी आमाशाची भर पडली रोगाची वाढ पाहूनच त्याच्या समतीने मीं तुला तार केली." मी आलो असे त्याना त्याच्या पत्नीकडून कळताच ते म्हणाले, " माझी शेवटची इच्छाही देवाने पूर्ण केली." मला पाहून ते उठून बसले. व माझ्या डोळयात अश्रु आलेले पाहून म्हणाले, " आपण आले आहात त्या अर्थीं आता सर्वांचे मगलच होईल.'' पुढे म्हणाले " हाय हाय ! तुम्हीं आलात, आणि या देहाकडून आपली सेवा घडली नाही ! मी आपला फार अपराधी आहे." माझ्या जेवणाखाण्याची तयारी करण्यास त्यानी पत्नीला सागितले. व मी रडत रडत दुसरीकडे निघून गेलो. या आजारात स्वतःच्या आजाराबद्दल त्यानीं एक अवाक्षरही तोडांतून बाहेर काढले नाहीं. एकवेळ मात्र आपल्या पत्नीला म्हणाले

" माझ्या प्रारब्ध कर्माचा क्षय होत चालला आहे, अगदीं थोडेसेच बाकी आहे." भाद्रपद महिन्याच्या अखेरीपासून त्याची प्रकृती बिघडली होती. ते फक्त दिवसा एक दोन घास अन्न खात, व रात्रीं उपवास करीत त्यामुळे हळू हळू त्याचा देह अगदीं अशक्त होऊन गेला. त्या मृतप्राय देहाकडे पाहून त्याच्या पत्नीला एक वेळ निश्वास सोडताना नागमहाशयानी पाहिले तेव्हा ते म्हणाले, " या क्षुद्र हाडामासाच्या सापळ्याची तू व्यर्थ चिंता करू नकोस " त्यानीं औषध घ्यावे म्हणून त्याच्या पत्नीने आपली शिकस्त केली, पण व्यर्थ. औषधाची गोष्ट काढताच ते म्हणत, ' श्रीरामकृष्ण म्हणत ' हिंन्चे भाजी म्हणजे भाजी नव्हे. ती खुशाल खावी,' तिने काही अपाय होणार नाहीं." पथ्य म्हणून फार तर तिचा थोडासा रस ते घेत

मी त्याच्या महासमाधीच्या अगोदर १३ दिवस देवभोग येथे होतो, पण नागमहाशयाना मी काही घरात नेऊन निजवू शकलो नाही. मध्ये मध्ये त्याना प्राणातिक वेदना होत असलेल्या दिसत, पण ते क्षणभरही घाबरे झालेले दिसले नाहीत. श्रीरामकृष्णाच्या गोष्टीखेरीज त्याच्या मुखातून कसल्याही गोष्टी निघत नव्हत्या. ते तेरा दिवस, मीं एकसारखे त्याच्याजवळ बसून काढले. मी त्याना मधून मधून भागवत, गीता, उपनिषद वगैरे ग्रथ ऐकवीत असे, मध्ये मध्ये काहीं पद गाऊन दाखवीत असे. तीं ऐकता ऐकता नागमहाशय कधी कधीं समाधीमग्न होत, व त्याच स्थितींत तास दीड तास जाई. समाधि उतरल्यावर निजून उठलेल्या मुलाप्रमाणे कधी कधी ते " आई! आई! " म्हणून हाक मारीत आणि तेव्हा त्याच्या देहावर प्रेमाची अष्टसात्विकभावाची लक्षणे दृग्गोचर होत. कधी कधी गाढ समाधीनतर ते म्हणत " सच्चिदानद ! अखड चैतन्य ! अखड चैतन्य !"

नागमशयाची व्याधि वाढू लागली तेव्हा त्याची भगिनी शारदामणी, त्यांची सासू, कैलासबाबू वगैरे सर्व मडळी त्याची सेवा करण्याकरिता देवभोग येथे जमा झाली. परतु त्यानीं कोणालाच सेवा करू दिली नाहीं. त्याची पत्नी फक्त अतःकरणपूर्वक त्याची सेवा करीत होती.

मी देवभोग येथे आल्यापासून ते माझ्या हातून पथ्यपाणी घेत. कलकत्याहून फळे वगैरे आणताना मला वाटले होते कीं, ते यातील काहींच ग्रहण करणार नाहींत, पण मीं माझ्या हाताने जे काहीं दिले, ते सर्व त्यानीं ग्रहण केले.

श्रीयुत नटवर, हरप्रसन्न, पार्वतीचरण, अन्नदा वगैरे मंडळी वरचेवर येत जात असत, व कधीं कधीं रात्र देखील तेथेच घालवीत नारायणगज येथील लोक सरकारी कामगार वगैरेही त्याच्या समाचारास येत असत त्यांचे म्लान चेहरे दृष्टीस पडताच नागमहाशय म्हणत, "हाय हाय ! उगीच कष्ट घेऊन या हाडामासाच्या पिंजऱ्याला पाहावयास का आलात ? हा देह आता फार दिवस राहणार नाहीं ! " त्यांचे हे वाक्य ऐकून त्यांची पत्नी रडत रडत मला म्हणाली, " याच्या मुखातून कधीही असत्य गोष्ट बाहेर पडली नाही. आता ज्याअर्थी तेच म्हणतात कीं, माझा देह जास्त दिवस राहणार नाहीं, तेव्हा हे आता खात्रीने ब्रह्मलीन होणार."

या दारुण दुखण्यातही नागमहाशय घरीं आलेल्या अतिथि मंडळीच्या जेवण्याखाण्याची वगैरे सर्व बारीक गोष्टीचीही चौकशी करीत. कोणाला काय खाण्याचे पदार्थ आवडतात, कोणाची कुठे निजण्याची व्यवस्था करावयाची, बाजारातून काय आणावयाचें, वगैरे सर्व गोष्टी ते पत्नीला सांगत. कैलासबाबूनीं बाजारहाट करून आणावा, आणि आम्हीं त्या तसल्या कठीण प्रसंगींही चैन करावी ! मृत्यूपूर्वी पाच दिवस नागमहाशयानीं कैलासबाबूला पाठवून माझ्याकरिता दही दूध आणविले. तीन दिवसापूर्वी मला आवडणारे मागनमासे आणवून खाऊ घातले ! इतकी बारीक सारीक गोष्टींची ते काळजी घेत असत ! मी दिवसा बराच काल त्यांच्याजवळ बसून घालवीत असे नागमहाशय " भगवान् दयावान, भगवान् दयावान, " असे एकसारखे म्हणत असत. त्यांच्या दारुण वेदना पाहून माझ्या मनात येई, 'भगवान् दयावान् कसचा ? भगवान् निष्ठुर.' एक दिवस त्यांच्या बिछान्याजवळ बसलो असता वरील विचार माझ्या मनात चालले होते, ते जाणून ते म्हणाले, " ईश्वराच्या अपार करुणेच्या बाबतींत कधींही मनात संदेह आणू नका.

या माझ्या देहाकडून जगाचं काय हित होणार ? हेंच पहाना, या वेळेस बिछान्यावर पडल्यामुळे मी आपली कांहीही सेवा करू शकत नाही. भगवान् श्रीरामकृष्ण, म्हणूनच कृपा करून हा टाकाऊ देह पंचभूतांत मिळवून टाकीत आहेत !!" नंतर क्षीण आवाजाने म्हणू लागले, "तो देह जाणे आणि ते दुःख जाणे, मना ! तू मात्र आनंदात रहा." मला जेव्हा विषण्ण असलेला पहात, तेव्हा ते म्हणत, "या क्षुद्र देहाचा कां विचार करितां ? या क्षुद्र हाडामासाच्या सापळ्याचा विचार करू नका, जगदंबेचें नांव घ्या ईश्वराचें नांव घ्या. या युगांत हेंच भवरोगावर रामबाण औषध आहे." हे ऐकून, मी आपल्या दाबून ठेविलेल्या मनोवृत्तींना मोकळ्या करण्यासाठीं अत्यंत तन्मय होऊन गाऊं लागलोः—

आईगे भक्तीचें वेड लावी मज । नाहीं मग काज ज्ञानाचेंही.॥ उन्मत्त होऊन हे गातां गातां माझें देहभान हरपून गेलें. थोड्या वेळाने नागमहाशयाची पत्नी हाका मारते आहे असें मला ऐकू आलें. तिच्याकडे पहातांच तिने नागमहाशयाकडे बोट केलें. पहातो तों नागमहाशय उठून बसले आहेत, दृष्टी नासाग्रीं स्थिर आहे, डोळ्यांतून एकसारख्या प्रेमाच्या अश्रुधारा चालल्या आहेत. मी त्यांना इतक्यांतच धरून निजविलें होतें. गाणें ऐकतां ऐकतां त्यांना केव्हा समाधि लागला, व ते केव्हा उठून बसले याची मला भ्रांत राहिली नाहीं. त्यांना असें बसलेले पाहून मला भय वाटलें. समाधि लवकरच उतरला तेव्हा त्यांना बसणें अशक्य झालें म्हणून मी त्यांच्या पत्नीच्या साह्याने त्यांना आंथरुणावर निजविलें पडल्या पडल्या त्यांचें वरील गाणें गुणगुणणें चाललेंच होतें.

व्याधि दिवसेंदिवस वाढत चालली, व आहारही जवळ जवळ बंद झाला. क्वचित् एकादें अर्धे मुर्धे फळ खाल्लें, तर खात. त्यांच्याजवळ रात्रीं मनुष्य असणें जरूर वाटू लागलें, म्हणून त्यांची पत्नी व मी आळीपाळीने जागू लागलों. मी बहुतेक उत्तररात्रीं जागत बसत असें. एक दिवस व्याकूळ होऊन मी त्यांना म्हणालों, "मला कृतार्थ करून जा, आपण गेल्यावर कोणाच्या तोंडाकडे पाहून आम्ही संसारांत रहावें ?" तेव्हा ते म्हणाले "भय नाहीं श्रीरामकृष्णभक्त झालाच आहेस तर ते

अवश्य कृपा करतीलच. मगल व्हावे अशी ज्याची इच्छा असेल त्याचें अमगल कधींच होत नाहीं." स्वामी शारदानद त्या वेळी डाका येथें श्रीरामकृष्ण मिशनतर्फे काहीं कार्य करण्यास आले होते. ते नेहमीं नागमहाशयाच्या समाचारास येत, व त्याच्या शुश्रूषेसबधीं योग्य त्या सूचना करीत. श्रीरामकृष्णाचे भक्त म्हणून त्याना नागमहाशय सेवा करू देत नसत. एक दिवस नागमहाशयास स्वामी शारदानदानीं २-३ पदे म्हणून दाखविलीं. पदे ऐकता ऐकता नागमहाशयाचा समाधि लागला. तेव्हा स्वामी शारदानदाच्या सागण्यावरून त्याच्या कानात काली नाम उच्चारताच त्याचा समाधि उतरला. बेलूड मठातून शारदानदानीं होमिओपाथिक औषध आणवून नागमहाशयास दिले, पण दुर्दैवाने कशानेही रोग कमी न होता तो दिवसेंदिवस सारखा वाढूच लागला.

महासमाधीच्या पूर्वी कालीपूजा करण्याची नागमहाशयानी इच्छा दर्शविली. शनिवारी रात्रीं पूजेची वेळ ठरली. पूजेच्या सामानाची त्याच्या पत्नीने सर्व जुळवाजुळव केली, प्रतिमा तयार करण्यास सांगितली. कोणत्याही गोष्टींची उणीव राहिली नाहीं. पूजेच्या रात्रीं नटवर व मी हजर होतो. प्रतिमा आणल्यावर स्वामी शारदानद म्हणाले, "नागमहाशय तर उठून बसू शकत नाहींत, तेव्हा एकदा त्याना प्रतिमा दाखवून आणा, व नतर मडपात बसवा." मी कालीची मूर्ति त्याच्या उशाकडे ठेऊन म्हणालो, "आपणास कालीची पूजा करावयाची आहेना? प्रतिमा आणली आहे व आपल्या डोक्याकडे ठेविली आहे." नागमहाशय डोळे मिटून पडले होते. प्रतिमेचे दर्शन होताच "आई! आई!" म्हणून गाढ समाधिमग्न झाले. पूर्वी स्वामी शारदानदानीं सागितल्याप्रमाणे त्याच्या कानात काली नामाचा उच्चार केला, पण समाधिभग झाला नाहीं. नाडीची हालचाल नाहीं कीं हृदयाचे ठोकेही नाहींत! तेव्हा त्याची पत्नी रडत रडत म्हणाली, "मला वाटते काली पूजेचें निमित्त करून हे आपणाला सोडून गेले." हे ऐकून मीही रडू लागलों.

स्वामी शारदानद म्हणाले, "भिऊ नका, लवकरच त्याचा समाधि उतरेल." जवळ जवळ दोन तासानतर त्याचा समाधी उतरला, आणि

" आई आनदमयी ! आई आनदमयी !" म्हणत म्हणत ते एकाद्या लहान मुलाप्रमाणे रडू लागले थोड्या वेळाने नागमहाशय मला म्हणाले " कालीपूजा झाली काय?" मी म्हणालो, " आई तर सध्याकाळपासून आपल्या उशाकडेच आहे, आपण सागाल तर मडपात घेऊन जाऊ." आम्ही त्याच्या अनुमोदनाने प्रतिमा मडपात नेली. झाज घटा वाजू लागल्या, रात्रीं दहाच्या सुमारास पूजेला सुरवात झाली. नागमहाशयाची आज्ञा घेऊन पुरोहिताने देवीची प्राणप्रतिष्ठा केली. पूजेनतर कालीला बळी न देता त्याबद्दल खडीसाखर व मद्याच्या ऐवजीं भाग याचा नैवेद्य दाखविला षोडशोपचारे पूजा झाल्यावर निर्माल्य आणून पुरोहिताने नागमहाशयाच्या मस्तकावर ठेविले. थोडा वेळपर्यंत त्याना भावसमाधी लागली पण लवकरच ते सहजावस्थेवर आले. स्वामी शारदानद पूजेच्या पूर्वींच डाका येथे निघून गेले होते. पहाटे मी त्याच्या शय्ये जवळ बसलो असता म्हणालो, " आज आपली अवस्था पाहून माझ्या मनात आले होते कीं, आपण आता देहावर येणार नाही." तेव्हा ते क्षीण स्वराने म्हणाले, "प्रारब्धाचा क्षय झाल्याशिवाय देह पडेल कसा?" रक्षाकालीच्या पूजेने आम्हाला जरासे आश्वासन मिळाल्यासारखे झाले. आम्हाला वाटले रक्षाकाली याचे रक्षण आता खास करील. आमच्या मनातील भाव जाणून नागमहाशय म्हणाले, "आई आज रक्षाकालीच्या रूपाने दया करावयास आली आहे. या हाडामासाच्या पिंजऱ्याचे रक्षण करण्याकरिता आली नाहीं, तर जे मगलाकाक्षी भक्त दया करून आपली पदधूली मला देण्यास येथे आले आहेत, त्याचे सकटातून रक्षण करण्याकरिता आली आहे ! मगलमयी आई आपले रक्षण करो !! " त्याचा रक्षाकाली पूजेचा हेतु तेव्हा मला समजला. दुसऱ्या दिवशीं श्रीरामकृष्णाच्या गोष्टी चालल्या असता ते मला म्हणाले, " दयामय श्रीरामकृष्णाच्या चरणीं आपली दृढ भक्ति विश्वास उत्पन्न होवो ! मी अज्ञ मनुष्य आणि हे जाणूनच त्यानीं थोर मनाने माझ्यावर कृपा केली " असे म्हणून "जयरामकृष्ण ! जयरामकृष्ण !" असे म्हणत श्रीरामकृष्णाना ते नमस्कार करू लागले.

पितृश्राद्धाच्या वेळीं, ज्या सावकाराकडून नागमहाशयानीं आपले घर गहाण ठेऊन कर्ज काढले होते, तो सावकार दुसऱ्या दिवशीं त्याना भेटावयास आला. नागमहाशयानीं त्याला दोन्ही हात जोडून नमस्कार केला, व म्हणाले, "मी आपले ऋण फेडू शकलो नाहीं. व हा देह आता फार दिवस रहात नाहीं. आपल्या कृपेनेच पितृश्राद्ध पार पडले. आपण चिंता करू नका, हे घर आपलेच आहे. आपण योग्य वेळ येताच घर आपल्या ताब्यात घेऊन त्याचा खुशाल उपभोग घ्या." पुढे पत्नीचा उल्लेख करून म्हणाले, "ही आपले राहिलेले आयुष्य पितृगृहीं काढील." नागमहाशयाचे हे भाषण ऐकून सावकार दुःखित होऊन म्हणाला, "आपण या माझ्या एवढ्याशा कर्जाची बिलकुल काळजी करू नका. मी आपणाकडे काहीं पैशाकरिता आलो नाहीं, मी आपल्या दर्शनास आलों आहे." "ही सर्व रामकृष्णाचीच दया!" असे म्हणून त्यानी आपलें डोळे मिटून घेतले. सावकार निघून गेल्यावर सुमारे चार तासानीं नागमहाशयाचे भावातर झाले. बिछान्यात तळमळ करीत बडबडू लागले. थडी अतिशय होती तरी दोन पख्यानी वारा घालूनही त्याचा दाह शात होईना. वरचेवर उठून बसू लागले एक वेळ नटवर बाबूनीं त्याना उठवून बसविले, तो पुन्हा लगेच निजवावे लागले. नागमहाशय काहीं वेळ अगदी शात पडले. नतर पुन्हा काही बडबड करावयास लागले. त्यावेळीं नटवर बाबू निघून गेले होते. त्याच्याजवळ मी व त्याची पत्नी दोघेही बसूनच होतो. इतक्यात नागमहाशय एकाएकी "वाचवा! वाचवा!" म्हणून मोठ्याने ओरडले, तेव्हा त्याची पत्नी रडत रडत म्हणाली, "आपणच तर मला म्हणत होता की मृत्यूच्या वेळीं मला कसलाही मोह उत्पन्न होणार नाही म्हणून? मग आता असे का बरे करिता?" मी किंकर्तव्यमूढ होऊन बसून राहिलो होतो. अर्ध्या तासाने नागमहाशयाना अर्धवट झोप लागली, ती मोडल्यानतर त्याना थोडें गरम दूध पाजले.

नागमहाशयानीं "वाचवा, वाचवा," म्हटले याचे कारण मी स्वामी विवेकानद यास विचारले असता त्यानीं उत्तर दिले की, "त्यावेळी तू

त्याच्या शरीराकडेच पहात होतास. आतले तर तुला काहींच कळत नव्हते आत तर ते पूर्णप्रज्ञ स्थितींतच होते शरीर धारण केले कीं त्याबरोबर थोडेसें जीवाचे धर्मही येणारच. न राहिले तर त्याला शरीरी म्हणताच येणार नाहीं अशा प्रकारची अवस्था बहुतेक सर्व महापुरुषाची होते. 'वाचवा' म्हटल्याने जीवन्मुक्त नागमहाशयाना काहींही कमीपणा येत नाही दुसरे, त्यानी 'वाचवा' कोणत्या अर्थाने म्हटले हे आपल्याला कसे समजावें ? मला वाटते कीं अनित्य देह टाकून स्वस्वरूपाची प्राप्ति होण्याकरिताच असे उद्वेगजनक उद्गार त्यानी काढले असावे "

नागमहाशयानी 'वाचवा' म्हटले यावर गिरीश बाबूचे खालील प्रमाणे उद्गार आहेत " श्रीरामकृष्णाचे पार्षद कधींही मुक्तीची आकाक्षा करीत नाहींत, व त्यानीं केली असता त्याना निर्वाण मुक्ति मिळतही नाही कारण भगवान् जेव्हा अवतार धारण करितो तेव्हा त्याबरोबर त्याच्या पार्षदगणानाही देह धारण करून यावे लागते नागमहाशयाना ससारमोह बिलकुल नव्हता मायामुक्त महापुरुष नागमहाशय वाचण्याची इच्छा न राखते, तर कोणत्या इच्छेच्या आधाराने त्याना पुन्हा परमेश्वराबरोबर देह धारण करून येता आले असते ? म्हणून नागमहाशयानी नरशरीर धारण करण्याची वासना ठेऊन देहत्याग केला. ही वासना केवळ ईश्वराच्या लीलेच्या पुष्टीकरिता होती ! " काहींही असो, मृत्यूपूर्वी त्याच्या मनाला आणखी कधीही मोहाचा स्पर्श झाला नाही, एवढे खरे.

महासमाधीच्या पूर्वी नागमहाशयानीं मला पचागात प्रस्थानासाठी चागला दिवस पहाण्यास सागितले. त्यावेळी नागमहाशय महायात्रेचा दिवस ठरविण्यास सागत आहेत हे मला समजले नाही. मी पचाग पाहून म्हणालो " पौष शुद्ध त्रयोदशीला दहा वाजता चागला मुहूर्त आहे." तेव्हा नागमहाशय म्हणाले " आपण अनुमति द्याल तर त्याच दिवशीं महायात्रा करावी असे म्हणतो." त्याचे हे उत्तर ऐकताच मी स्तभित झालो. माझा जीव व्याकूळ झाला व मी ही हकीगत त्याच्या पत्नीला सागितली, तेव्हा ती म्हणाली " आता का रडतोस बाबा ? ते काहीं आता राहत नाहींत खास. मग त्याचीच इच्छा पूर्ण होऊ दे,

श्रीरामकृष्णाची इच्छा पूर्ण होऊ दे, त्यानीं शुद्धीवर असताना देह ठेविलेला पाहून मला आनंद होईल."

वरील शुभ दिवस ठरवून नागमहाशय निश्चिंत झाले मृत्यूपूर्वी दोन दिवस आधी रात्रीं दोहोंच्या सुमारास मी, त्यांची पत्नी, व हरप्रसन्नबाबू त्यांच्या शय्येजवळ बसलो असता नागमहाशय डोळे मिटून पडले होते. थोड्या वेळाने एकाएकी डोळे उघडून गडबडीने मला म्हणाले " श्रीरामकृष्ण आले आहेत ते मला सर्व तीर्थांचें दर्शन करविणार आहेत!" मला स्तब्धच बसलेला पाहून पुन्हा म्हणाले "तुम्हीं जी जी तीर्थे पाहिली असतील त्यांची एकामागून एक नांवे घ्या, मी ती पहात जातो."

मी नुकताच हरिद्वाराला गेलों होतो म्हणून हरिद्वारचे नाव घेतलें. नागमहाशय उत्कंठित होऊन म्हणाले " हरिद्वार! हरिद्वार! ही पहा आई भागीरथी कल कल शब्द करीत पहाडातून खाली येत आहे. हे पहा, तिच्या लाटा लागून काठावरील वृक्ष डुलत आहेत! तो पहा पलिकडे चंडीचा पहाड! ओहो! किती तरी घाट गंगेला बांधले आहेत! आपण जरा थांबा, मी आज वीस वर्षे स्नान केलें नाहीं, तेव्हा जरा गंगास्नान करून मानव जन्म सफल करून येतो!" असे म्हणून " गंगा, गंगा! आई, पतित पावनी! आई अधम तारिणी!" असे म्हणत ते गाढ समाधिमग्न झाले! त्यांचा समाधिभंग झाल्यावर मला वाटलें की खरोखरीच ते गंगास्नान करून येत आहेत.

नागमहाशयांनी दुसऱ्या तीर्थाचे नाव घ्यावयास सांगितलें. मी यत्राप्रमाणे "प्रयाग" म्हटलें. तोंच नागमहाशय "जय यमुने! जय गंगे!" असे म्हणून नमस्कार करूं लागले. नंतर म्हणाले, येथेंच भारद्वाजाचा आश्रम होताना? मग मला तो दिसत नाहीं कुठे? हा गंगायमुनाचा संगम, हा पहा तो पलीकडे पहाड दिसत आहे. हाय हाय! श्रीरामकृष्ण भारद्वाजाचा आश्रम का बरे दाखवीत नाहींत? असे म्हणत असता त्यांना थोडी अर्धवट झोंप लागली. पुन्हा दोन तीन मिनिटांनी म्हणाले " ओहो! हा पहा भारद्वाज मुनींचा आश्रम दिसावयाला लागला!" पुन्हा थोडा वेळ शांत राहून म्हणूं लागले " आई तूं राजराजेश्वरी!

महाभक्तीचा अवतार असून रानावनात का फिरतेस ? जयराम ! जयराम !"
म्हणता म्हणता नागमहाशय पुन्हा समाधीमग्न झाले. समाधीभगानतर
मी सागर तिर्थाचे नाव घेतले, तोच ते जणू सगर वशाचा उद्धार होत
असलेला प्रत्यक्ष पाहू लागले ! समुद्रदर्शन करून पुन: पुनः प्रणाम
करू लागले. नतर मी काशिधामाचे नाव उच्चारिले, तोच नागमहाशय
" जयशिव, जयशिव, विश्वेश्वर, हर हर ॐ! ॐ! " म्हणू लागले, नतर
म्हणाले " यावेळी मी महाशिवात लीन होईन! " माझ्या तोडून जग-
न्नाथ क्षेत्राचे नाव निघताच नागमहाशय म्हणाले ' हे पहा उच्च मदीर !
ही पहा या आनदाच्या बाजारात प्रसादाची खरेदीविक्री चालली आहे."
मला वाटते त्यानी एक दोन वेळ चैतन्य देवाचे नाव उच्चारिले. याप्र-
माणे रात्रीचे चार वाजवून गेले, तेव्हा नागमहाशयाना थोडी तद्रा लागू
लागली दुसरा दिवस उजाडेपर्यत त्याची तद्रा मोडली नाही म्हणून
गावातला एक वैद्य बोलाविला. त्याने एक होमिओपाथिक औषधाची
पुडी दिली ते औषध त्याना खाऊ घातले व काकडा करून त्याने
थोडेसे दूधही पाजले नागमहाशयाच्या आयुष्यातला हाच शेवटचा
आहार. माझे जेवण झाल्यावर मला आठवले की, आज त्याचा महाया-
त्रेचा दिवस आहे

पौष शुद्ध १३ चे दिवशी ८ वाजल्यानतर त्याना पुन्हा पुन्हा समाधि
लागू लागला. मी त्याच्या कानात अखड श्रीरामकृष्णाच्या नावाचा घोष
चालविला. श्रीरामकृष्णाचा फोटो त्याच्या समोर धरून मी म्हणालो
" ज्याच्या नावाने आपण सर्वस्वाचा त्याग केला, ही पहा त्याची
मुर्ति ! " दर्शन घेऊन त्यानी हात जोडून नमस्कार केला, व क्षीण स्वराने
म्हटले—" कृपा, कृपा, सारी आपलीच कृपा ! " हेच त्याचे
शेवटचे शब्द.

सुमारे ९ वाजण्याच्या सुमारास नागमहाशयाना ऊर्ध्व सुरू झाला,
डोळे थोडेसे लाल झाले, ओंठ कापावयाला लागले. जणू काहीं बोलत
आहेत कीं काय असे वाटे. नतर अर्ध्या तासाने त्याची दृष्टि नासाग्रीं
स्थिर झाली. सर्वांगावर रोमाच आले व शरीरावरील केस ताठ झाले,

डोळ्यातून प्रेमाश्रूच्या धारा वाहू लागल्या. हळू हळू प्राणवायु मूलाधारा हून सुटून, हळू हळू प्रत्येक पद्म उल्लघून वर जाऊ लागला मूलाधारातून वायु जेव्हा हृदय पद्मात आला, तेव्हा जोराने श्वास चालू लागला, नतर १० वाजून ५ मिनिटानीं नागमहाशय महासमाधीत स्थिर होऊ लागले. हे कळताच त्याची पत्नी मला म्हणाली " यानी आपले सारे आयुष्य गृहस्थाश्रमातच घालविले आहे, तेव्हा त्याचा अतिम विधि सुद्धा गृहस्था-श्रम धर्मानुसार करणे हेच उचित. " तिच्या आज्ञेप्रमाणे कैलासबाबू, पार्वतीबाबू, आदित्यबाबू व मी चौघानीं धरून नागमहाशयास बाहेर आणिले व एका तक्तपोषावर चागली शय्या करून त्यावर त्याना निज-विले. अजूनही त्याचा प्राणवायु सावकास वहात होता बाहेर आणल्या-वर ५–७ मिनिटानी तोही बद झाला, व नागमहाशय ब्रह्मलीन झाल्याचे सर्वांना कळून चुकले अजूनही त्याचे मुखमडळ तेजस्वी दिसत होते व नेत्र अर्धोन्मीलित असून त्यात प्रेमाश्रुबिंदु दिसत होते रडण्याचा एकच कल्लोळ उठला मी त्याच्या पत्नीला म्हणालो " आई, शात व्हा तुम्हाला भय कसले ? तुमचा भार ते आमच्यावर देऊन गेले आहेत हीं सारी तुमची अपत्ये आहेत, त्याच्याकडे पाहून आपला शोक आवरा " शोकाचा पहिला नर ओसरल्यावर त्याच्या पत्नीच्या आज्ञेनुसार कैलास बाबू चदनकाष्ठे, घृत वगैरे सामान आणण्यासाठी नारायणगज येथे निघून गेले. महायज्ञाची पूर्णाहुति देण्याची तयारी होऊ लागली.

इतर भक्ताच्या सहाय्याने मीं नागमहाशयाना ज्या तक्तपोषीवर निज-विले होते, त्यावर एक छत टागले गावातील अनुभवी लोक येऊन प्रेताची परीक्षा करू लागले. शरीर उष्ण होते म्हणून अग्नि द्यावा कीं नाहीं याची वाटाघाट सुरू झाली तेव्हा मीं सागितले कीं, " नागमहा-शयासारख्या महापुरुषाचा देह निदान बारा तास तरी ठेऊन नतर त्याला अग्नि देणे हे उचित." गावातील सर्वश्रेष्ठ ब्राह्मण श्रीयुत कामिनी गागुली याच्या पित्याने माझे म्हणणें सुसगत आहे असे आपले मत देऊन, सर्वांना त्याचप्रमाणे करण्यास सागितले. रात्री १० वाजता अग्निसस्कार देण्याचें नक्की ठरले, व तोपर्यंत त्याचा पवित्र देह आगणा-

तच ठेविला. थोड्या वेळाने माझ्या मनात आले की, "हा देह आता लवकरच भस्मसात् होणार तेव्हा त्याचा एकदा फोटो घेऊन ठेवणे चागले." फोटोग्राफर आणण्याकरिता एक मनुष्य नारायणगज येथे रवाना केला. फोटोग्राफर तेव्हा घरीं नव्हता म्हणून गेलेला मनुष्य तेथेच थाबला, व फोटोग्राफर घरीं आल्यावर, त्याला घेऊन सुमारे ३ वाजता नागमहाशयाच्या घरीं येऊन पोहोचला.

नागमहाशयाच्या हयातींत त्याचा फोटो घेण्याची मी पुष्कळ खटपट केली होती, पण ती साध्य झाली नाही नागमहाशय म्हणत "या क्षुद्र हाडामासाच्या पिजऱ्याच्या फोटोची काय जरूरी आहे?" हाय हाय! ज्या जिव्हेने वरील वाक्य उच्चारले ती जिव्हा आज कायमची शात झाली आहे! असो. त्याचे पवित्र शरीर माळानी सुशोभित करून त्याचे दोन फोटो घेतले. याच फोटोवरून श्रीयुत प्रियनाथ सिंह यानीं एक तैलचित्र तयार केले, ते हल्ली नागमहाशयाच्या घरी आहे व या पुस्तकातील चित्र त्याच तैल चित्रावरून घेतले आहे.

सूर्यास्तापूर्वी नागमहाशयाच्या पत्नीने धूप, दीप, नैवेद्य वगैरेंनी नाग महाशयाच्या चरणाची पूजा केली. सात प्रदक्षिणा करून आपल्या लाब केसानी त्याचे चरणयुगुल पुसले हजारों बिल्वपत्रपुष्पानीं आम्ही नागमहाशयाचा देह अगदीं झाकून टाकला नागमहाशयाच्या मृत्यूची बातमी सर्व गावभर पसरून जिकडे तिकडे आकात माजला होता चारी बाजूनी लहान मोठे स्त्रीपुरुष, सर्व तऱ्हेचे सर्व प्रकारचे लोक हाहाःकार करीत जमा झाले, व गावातील प्रत्येक घर शोकसागरात बुडून गेलें

रात्रीं १० वाजता चदनकाष्ठे रचून नागमहाशयाची अखेरची शय्या तयार केली व यथाशास्त्र सर्व विधि केल्यानतर त्याचा पवित्र देह अग्नीच्या मुखात अर्पण केला! नतर त्या चितेत मीं बिल्वपत्राचा होम सुरू केला, इतक्यात स्वामी शारदानद तेथे येऊन पोहोचले व त्यानी चितेसमोर साष्टाग नमस्कार घातला. सुमारे तीन तासात नागमहाशयाचा मर्त्य देह पचतत्वात मिळून गेला. नतर त्याच्या पत्नीने स्नान केले त्याच्या पत्नी-

शिवाय आम्हीं कोणीच स्नान केले नाही त्याच्या पवित्र देहाच्या भस्म-राशीला स्पर्श करून आम्ही सर्वजण शुद्ध होऊन गेलो ! मग स्नान कसचे ?

दीनदयाळच्या मरणानतर तीन वर्षांनी नागमहाशयाचा मर्त्य देह, वयाच्या ५४ व्या वर्षी, आपली जन्मभूमि देवभोग येथे पचत्वात मिळून गेला, आणि मागे केवळ थोडेसे भस्म मात्र शिल्लक राहिले !

दुसऱ्या दिवशी स्वामी शारदानद याच्या आज्ञेनुसार, एका पितळेच्या भाड्यात सर्व रक्षा भरून, त्यात त्याची स्वरचित पदे ठेऊन, ती कळशी त्या चिताभूमीत पुरली

मृत्यूपूर्वी त्यानी ज्या काली–मूर्तीची पूजा केली होती, तीच मूर्ती त्याच्या समाधीवर स्थापन करण्यास स्वामी शारदानदानी सागितले. आम्ही त्यावर एक चागले छत टागून दिले

नागमहाशयाच्या ऋणासबधी वाटाघाट करून व त्यासबधी काही सूचना करून, स्वामी शारदानद डाका येथे निघून गेले. चवथ्या दिवशी मीहि त्या चिरशातीमय स्थानाची कायमची परवानगी घेऊन तेथून कलकत्त्यास परत आलों.



# पुरवणी.

पहिल्या भागात उल्लेख केल्याप्रमाणे नागमहाशयरचित काही पदापैकी चार पदे खाली दिली आहेत.

## पद १ लें ( चाल—जमुनातट० )

जननी मज सांग कुठें असशी । करुणामयि ॥
थोर थोर ऋषि ध्यानि दिवानिशिं । दर्शन त्या न तरी देशी ॥१॥
हाय हाय मग मूढ किती मी । दर्शन दे म्हणतों तुजसी ॥२॥
सर्व दोष मम विसरुनि जननी । ठेवि मला स्वपदांपाशीं ॥ ३ ॥
मान सिद्धि धन मुळिंहि नको मज । भक्ति सदा तव दे मजसीं॥४॥

## पद २ रें ( चाल—दत्तराज योगी० )

काली मम माता । मी असा घोष करी नुसता ॥ धृ ॥
आशास्थल तूं सर्वस्वहि तूं आम्हां दीन जनांचें,
एकवारही अतःकरणीं स्मरण घडेना याचें ॥१॥
मनांत येतें विषयवासना सोडुनी नाम स्मरणी—
तन्मय व्हावें, परंतु हातुनि कांहिंच येना घडुनी ॥ २ ॥
नम्र होईना मन तव पायी विषय कर्दमी रमतें,
शिकवूं जातां भडकुनि उलटें वाऱ्यापरि तें भ्रमतें ॥ ३ ॥
दीन दास मी हताश झालों, पाहुं नको गे अंत
धांव अंबिके ! " थोर तुझें मन " असें सांगती संत ॥ ४ ॥

पद ३ रें ( चाल—रचना तव अनिवार० )

धांव पांव जगदंबा, दयामयि ! ॥ धॄ० ॥
भवाटवीच्या वणव्यामध्यें होरपळे मम अंग, दयामयि ॥१॥
तव विरहाच्या व्याकुळतेनें कांहिं सुचेना अंब ॥ २ ॥
जपतप साधन कांहींच नेणें काय करूं मी अंब ॥ ३ ॥
निजहृदयीच्या थोरपणानें तारि तारि मज अंब ॥ ४ ॥
निज दासाला दर्शन दे मज हीच आस मम अंब ॥ ५ ॥

पद ४ थें. ( चाल—भक्तिग पेणी )

कसा कैलासी । आणण्या जाउं गिरिजेसी ॥ धॄ० ॥
ऐकुनि गिरिजेशाची रीति । चित्तीं अतिशय उपजे भीती
राहि श्मशानी घेऊनि साथी । भुता खेतांसी ॥१॥ मी कसा
तिसरा झळके नेत्र ललाटीं । गळयांभोंवती सापचि वेष्टी
भस्म चर्चितो, कटिं लंगोटी । काय म्हणु यासी ॥ २ ॥ मी०
बरें, तयाचे गुणही मोठे । निज भक्तांना प्रेमें भेटे
जन्म मृत्युचे चुकवुनि खेटे । मुक्त करि त्यांसी ॥ ३ ॥ मी०
भक्त वांछि तें देइं तयासी । यानें येई धैर्य मनासी
घेउनि येतों श्रीगिरिजेसी । माय गिरिजेसी ॥ ४ ॥ मी कसा.



त्रिखंडविजयी श्रीमत् परमहंस

## स्वामी विवेकानंद

यांचे सद्गुरु

# भगवान् श्रीरामकृष्ण.

याचें मूळ बंगाली ग्रंथाच्या आधारें लिहिलेलें विस्तृत चरित्र छापत आहे चरित्राचे सुमारें चारचारशें पानाचे दोन भाग होतील. पहिला भाग येत्या दिवाळीच्या सुमारास प्रसिद्ध होईल. प्रत्येक भागात ३।४ सुंदर चित्रें येतील. मराठी भाषेंत अशा प्रकारचें हें पहिलेच पुस्तक असून, त्यावरून श्रीरामकृष्णांची थोरवी केवढी होती, हें कळून येईल.

खालील पत्त्यावर नावें नोंदण्याची त्वरा करावी.

गंगाधर लक्ष्मण जोशी,

खापर्डे याचा बगीचा, मालटेकडी रोड,

उमरावती.